३०/२१०

रु. १२५४

# नवभारत




वर्ष २९

अंक पहिला

ऑक्टोबर १९७५

रु. १-२८


अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


---

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष एकोणतिसावे
अंक पहिला

# नवभारत

ऑक्टोबर १९७५

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. वेडेकर— प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. मे. पुं. रेगे का. संपादक



वार्षिक रु. १२ अंकास रु. १·२५

हे मासिक श्री. रं. ब. जोशी यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. वेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता :—

१. संपादकीय :— कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
प्राध्यापकांचे निवासस्थान कीर्ति कॉलेज, दादर-मुंबई २८

२. व्यवस्थापकीय :— व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

# 'नवभारत' ज्ञानेश्वर विशेषांक



– 'नवभारता'च्या 'ज्ञानेश्वर विशेषांका'ची किंमत पाच रुपये राहील. मात्र वर्गणीदारांना त्याची वेगळी किंमत द्यावी लागणार नाही. हा अंक संग्राह्य होणार असल्याने जिज्ञासू वाचक, सार्वजनिक व खाजगी ग्रंथालये, महाविद्यालये, उच्च व माध्यमिक विद्यालये यांनी वर्गणीदार होणे त्यांना सोयीचे आहे. अंकाच्या प्रती मर्यादित असल्याने आपली मागणी शक्य तितक्या लौकर पाठवावी.

–हा अंक संग्राह्य स्वरूपाचा होणार असल्याने जाहिरातदारांनी आपली जाहिरात त्वरित पाठवावी.



पत्ता :– व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, प्राज्ञप्रेस. वाई ( जि. सातारा. )

## साभार पोच

प्रकाशक :– श्री. अ. अं. कुलकर्णी, कॉंटिनेंटल प्रकाशन,
विजयानगर कॉलनी, पुणे– ३०

१ विचारशिल्प :– ( तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे निवडक निबंध )
सं. रा. ग. जाधव / मूल्य सात रुपये.

अनुक्रमणिका






श्री. बापूराव नाईक

# ग्रीक रंगभूमी

## ग्रीक रंगभूमीचा प्रारंभ

ग्रीकांच्या रंगभूमीचा उगम निश्चितपणे केव्हा झाला हे आपल्याला माहीत नाही. परंतु इ. स. पूर्व ५३४ या वर्षी ग्रीस देशातील डायॉनिसिया ( Dionysia ) या शहराची पुनर्रचना झाली तेव्हा शोकान्तिकांची स्पर्धा आयोजित करण्यात आली होती असा उल्लेख सापडतो. त्या वर्षीच्या स्पर्धेमध्ये थेस्पिस् ( Thespis ) या नाटककाराला प्रथम पारितोषिक मिळाले. त्याचे एकही नाटक उपलब्ध नाही. परंतु नाटकांची स्पर्धा घेण्याइतपत रंगभूमीची प्रगती झाली होती, यावरून इ० पूर्व पाचव्या शतकापूर्वी ग्रीस देशात रंगभूमी अस्तित्वात होती, यात संशय नाही इ० स० पूर्व तीन हजार वर्षे इजिप्तमध्ये एक प्रगल्भ संस्कृती नांदत होती. त्या समाजास रंगभूमी माहीत होती असे दाखले सापडतात. परंतु ग्रीक रंगभूमीच्या उगमावर इजिप्शियन रंगभूमीचा परिणाम झाला होता असे म्हणण्यासारखा पुरावा उपलब्ध नाही.

## भारतीय रंगभूमीवर ग्रीक रंगभूमीचा परिणाम

भारतीय रंगभूमीवरील उपलब्ध नाटक अश्वघोषाचे. खरे म्हणजे ही उपलब्ध संहिता नाटकातील काही भागांचीच आहे. ( इ० स० पूर्व पहिले शतक) ह्यावेळी ग्रीकांच्या कला-संस्कृतीचे भारतावर वर्चस्व होते असे म्हणून तत्कालीन ग्रीक रंगभूमीचा भारतीय रंगभूमीवर परिणाम झाला होता असे पाश्चात्त्य पंडितांचे मत आहे. उलट ऋग्वेदातील संवादसूक्ते यज्ञप्रसंगी संवादरूपात नाटक म्हणून करून दाखविण्यात येत असत असे विद्वानांचे मत आहे. पाणिनी आणि पतंजली यांच्या ग्रंथांतील उल्लेख यावरून भारतीय रंगभूमी ही ग्रीक रंगभूमी-पूर्वीची नसली तरी समकालीन तर खासच होती. याबाबतची चर्चा करण्याचे हे स्थळ नव्हे. परंतु भारतीय रंगभूमी नाट्यशास्त्रांतर्गत स्वरूप आणि उपलब्ध नाटके यावरून ती ग्रीक रंगभूमीपासून वेगळी होती असे निश्चितपणे म्हणता येते. त्याबाबत पुढील विवेचनात मी उल्लेख करणारच आहे. इथे इतकेच सांगायचे की भारतीय रंगभूमीचा ग्रीक रंगभूमीच्या उगमाशी काही संबंध नाही.



अनुक्रमणिका

## रंगभूमीच्या इतिहासाची साधने

ग्रीकांच्या रंगभूमीची माहिती देणारी तीन प्रकारची अस्सल साधने उपलब्ध आहेत. पहिले 'उपलब्ध नाटके,' दुसरे 'ॲरिस्टॉटलचे काव्यशास्त्र' आणि तिसरे 'ग्रीक नाट्यगृहांचे अवशेष' याशिवाय समकालीन आणि नंतरच्या लिखाणातील प्रयोगांचे, त्यांच्या स्वरूपाविषयीचे आणि रंगभूषा, वेषभूषा आदी-करून बाह्योपकरणाविषयीचे उल्लेख, मूर्ती, पुतळे, चित्रे इत्यादी अवशेष आणि व्हिट्र्व्हीयस्, पोलक्स यांचे लिखाण ग्रीक रंगभूमीचे स्वरूप स्पष्ट करण्यास मदत करतात. यापैकी नाटकातील अंतर्गत पुराव्यावर फारसे अवलंबून राहण्या-सारखी स्थिती नाही. याचे कारण असे आहे की ग्रीक नाटकांचा एखादाच प्रयोग होई, असे वेब्स्टर म्हणतो. लिखित नाटकांच्या प्रयोगाच्या अनिश्चिततेमुळे ती जरी प्रयोगासाठी लिहिण्यात आली असली, तरी वाचकासमोर ठेवूनही लिहिण्यात येत असत असे त्यांच्या वर्णनात्मक ( narrative ) श्राव्य आणि काव्यमय स्वरूपावरून स्पष्ट होते.

## ग्रीक रंगभूमीचा प्रारंभ

ग्रीक रंगभूमीचा प्रारंभ, डायोनिसस ( Dionysus ) या सोमदेवतेच्या ( wine god ) स्तवनात झालेला आहे. अनेक शतके ग्रीक नाट्यप्रयोग या सोमदेवतेच्या उत्सवातच करण्यात येत. हा उत्सव वसंत ऋतूत मार्च महिन्याच्या शेवटच्या आणि एप्रिल महिन्याच्या सुरवातीच्या काही दिवसांत करीत, सोम देवतेला ग्रीक लोक सृजन देवता मानतात. ग्रीकांचा महादेव Zeus याला Semele या सामान्य स्त्रीपासून डायनायसस हा पुत्र झाला. त्याचा वध करण्यात आला; शरीराचे तुकडे तुकडे करण्यात आले. तरी त्याला संजीवनी प्राप्त होऊन तो पुनरुत्थापित झाला. त्याच्यावर पुराणकथा रचण्यात आल्या. या कथांतून जन्ममरणाचा फेरा, वसंत, उन्हाळा हिवाळा यांचे ऋतुचक्र, उत्पत्ती, संहार, पुनरुत्पत्ती, इत्यादी सृष्टिकल्पना गोवण्यात आल्या. थोडक्यात म्हणजे आपल्याकडील ब्रह्मा–विष्णु–महेशांच्या त्रिमूर्तीसारखे स्थान सोमदेवतेला प्राप्त झाले. सुरुवातीस काही शतके या उत्सवांना आपल्याकडील वाममार्गातील कर्मकांडासारखे स्वरूप होते, पुढे पुढे सोमदेवतेचे स्वरूप सिद्ध होता होता त्याच्या वार्षिक जन्मोत्सवांना धार्मिक रूप प्राप्त झाले. मुळात सोमदेवतापूजेचे लोण ग्रीकानी इ० स० पूर्व तेराव्या शतकात आशिया मायनरमधून आणले असे म्हणतात. हा काळ अथर्ववेदाच्या रचनेशी समकालीन आहे. अथर्ववेदातील काही सूक्तांशी ही ग्रीक आवृत्ती ताडून पहाण्यासारखी आहे.

## रंगभूमी सिद्ध होण्यापूर्वी नाट्यात्मक करमणूकप्रकार

इ० स० पूर्व आठव्या शतकानंतर डायनायसस्च्या उत्सवात समूहनृत्य आणि नृत्यगीत (dithy ramks) वीणागीते, याचा समावेश झाला. उत्सव-प्रसंगी काढण्यात येणाऱ्या मिरवणुकीत नृत्यवृन्द पशूंचे, पक्षांचे वेष घेऊन नाच गाण्यात भाग घेत त्यातूनच पुढे ग्रीक रंगभूमीचा उदय झाला. होमरच्या महाकाव्यांच्या वाचन-श्रवणाचा ग्रीक रंगभूमीवर परिणाम झाला. त्यांची काव्यरसग्रहणशक्ती जागृत झाली. ती त्यांच्या जीवनाचा भागच बनली. त्याचा सोमदेवतेच्या उत्सवातील गीतांवर परिणाम झाला. त्यातून सुखात्मिका आणि शोकात्मिका यांचा जन्म झाला. सुरवातीला देवता-स्तवनांचे स्वरूप उत्स्फूर्त आळवणीचे होते. त्यात पुढे काव्याचा प्रकर्ष झाला. डिथिरॅब या नृत्य-गीत प्रकारात वेणूच्या साथीवर पन्नास माणसांचा गीतवृन्द नाच-गाणे करी. त्यात गीतवृन्दाच्या दोन विभागांत संवाद आला आणि नाटच निर्माण झाले. त्याचे पर्यवसान शोकान्तिकेत झाले. मिरवणुकीत समूहगायन होई. त्यात पूर्वी लिंग-गीतांचाही Phallic Songs समावेश होता. या मिरवणुकीचे स्वरूप कोकणा-तल्या शिमग्यात शेंबट नावाने नाचगाणेयुक्त मिरवणुका निघतात त्यासारखे असावे. सामान्य लोकांतील व्यवहारसंघर्ष यांचा उपयोग केलेला असे. त्यातूनच पुढे सुखान्तिकेचा जन्म झाला.

डिथिरॅबमधील गीतवृंदाचा प्रमुख वेगळा होऊन त्याने नटाचे रूप घेतले; ती नाटचाची सुरवात. तो स्तवनगीत म्हणे, त्यात सोमदेवतेबद्दलचे प्रसंग असत, त्याचे कोरस अनुकरण करी. भजनात अभंग म्हणताना प्रमुखाने चरण म्हणावयाचा आणि भजनी मंडळीने त्याची री ओढायची अशासारखी ही पद्धती असे. थेस्पिसने कोरस-प्रमुखाला नट बनवले. कथेकरी कीर्तनातील आख्यानात वर्ण्य विषयांतील वेगवेगळ्या भूमिकांची भाषणे स्वतःच म्हणतो; त्याप्रमाणे नाटचकलेचे बीज रोवले गेले. पात्रविशेष दाखविण्यासाठी कपडे बदलण्यात, नवीन मुखवटा घालण्यात जो वेळ जाई त्या वेळात गीत-नृत्य वृंद-गायन-नृत्य करी आणि प्रयोगाची गती चालू ठेवी आणि श्रोत्यांना गुंतवून ठेवी.

## नाटककार आणि त्यांची नाटके

उपलब्ध ग्रीक नाटकांत आश्चिलस् (इ. स. पूर्व ५२५ ते ४५६) याची नाटके कालदृष्टचा सर्वांत जुनी. त्याने इ स. पूर्व ४९९ च्या सुमारास नाटच-स्पर्धेत प्रथम भाग घेतला. परंतु प्रथम पारितोषिक मिळायला त्याला १५

वर्षे लागली. त्याने एकंदर ७९ नाटके लिहिली, परंतु त्यापैकी फक्त सातच उपलब्ध आहेत. रंगभूमीवर दुसऱ्या नटाची योजना आश्चिलस्ने केली. त्यामुळे नाट्यमय संवादांना महत्त्व आले आणि गीतवृंदाचे वर्चस्व थोडे कमी झाले. ईश्वर, विश्व आणि मानव यांच्या संबंधावर त्याने लक्ष केंद्रित केले. भाषेची प्रगल्भता आणि प्रतिमा-विश्वाचे भव्यत्व, त्यांचे आश्चिलस्च्या नाटकांत दर्शन होते धर्म ( Religion ) आणि ईश्वरविद्या ( Theology ) यांचे स्वरूप जाणून घेण्याच्या प्रयत्नात मानवी व्यापारांचा तो अभ्यास करतो असे त्याच्या नाटकांवरून प्रतीत होते.

आश्चिलस्नंतरचा नाटककार सॉफॉक्लिस् ( इ. स. पूर्व ४९६ ते ४०६ ). त्याने शंभरांवर नाटके लिहिली परंतु त्यांपैकी फक्त सातच उपलब्ध आहेत. इ. स. पूर्व ४६६ मध्ये त्याला स्पर्धेत पहिले पारितोषिक मिळाले. सॉफॉक्लिसने रंगभूमीवर तिसऱ्या नटाची प्रथम योजना केली. त्याच्या नाटकांत सर्वांगीण परिणामकारकता आढळून येते; त्याचप्रमाणे नाट्यगत उपरोधाचा ( Dramatic irony ) आढळ होतो. जीवनहेतूचे दर्शन होते. त्याच्या 'ॲन्टिगनी' या शोकान्तिकेत मानवाची महत्ता आणि मौलिकता यांच्या चित्रणाचा यशस्वी उपक्रम केला आहे. इडिपस् रेक्स्मध्ये, विश्वातील अगम्य पण बलिष्ठ अशा शक्ती ( force ) मुळे विश्वाचे नियम सिद्ध होतात. हे नियम पवित्र असले तरी मानवाच्या बुद्धिक्षेत्राबाहेरचे असतात. कौशल्यपूर्ण समरप्रसंग ( Climaxcies ) आणि व्यवस्थितपणे वर्णिलेला ( well developed ) घटनानिर्मिती यांत सॉफॉक्लिस सिद्धहस्त आहे.

तिसरा नाटककार युरिपिडिस ( इ. स. पूर्व ४८० ते ४०६ ). त्याच्या ९२ नाटकांपैकी एकोणीस नाटके उपलब्ध आहेत. त्याच्या नाटकांत नाट्य-विषयांत नवा आशय आणलेला दिसतो. मनुष्यस्वभाव आणि मानवी व्यापार यांचे चित्रण त्याने केले. संसारात गुंतागुन्तीचे प्रसंग निर्माण होतात. त्याच्याशी तोंड देण्यात मानसशास्त्रीय प्रश्न निर्माण होतात. त्यांची उकल करण्याचा त्याचा प्रयत्न होता. गीत–नृत्यवृंदाचे ( कोरस ) महत्त्व त्याने आणखी कमी केले आणि त्यांच्या गीतांना विष्कंभकाचे स्थान दिले. त्याचे गायन वीणागीत-स्वरूपी झाले. ( lirical intertude's ) स्वभावाविष्काराला त्याने दिलेल्या स्थानामुळे आधुनिक रंगभूमीचे बीज त्याने रोवले असे म्हणतात. परंतु नाटकाच्या घाटाची ( form ) त्याला पुरेशी जाणीव होती असे दिसत नाही. ग्रीक रंगभूमीवरील देव-दानवांच्या वर्चस्वामुळे अतिमानुषी वातावरण असे ते त्याने नाहीसे केले आणि देव-दानवांना मानवी पातळीवर आणून ठेवले.

ग्रीक रंगभूमीवरील सुखान्तिकांचा अवतार हा ग्रामीण मिरवणुकीतील लिंग–गीतांतून ( Phallc songs ) आणि लोकव्यवहारावरील टीकात्मक भाष्यांतून झाला. प्रारंभी शोकान्तिकांच्या काळात त्यांना महत्त्व नव्हते. त्यांना स्पर्धांत वावही नसे. कोरसाचा आकार बराच लहान होता. सध्या उपलब्ध असलेल्या सुखान्त नाटकांचा लेखक ॲरिस्टोफेनिस ( इ. स. पूर्व ४४८ ते ३८० ) हा पहिला नाटककार. त्याने चाळीसवर नाटके लिहिली. त्यांपैकी अकराच उपलब्ध आहेत. त्यांचा ओल्ड कॉमेडीमध्ये समावेश होतो. ॲरिस्टोफेनिस-नंतरच्या नाटककारांनी हीच प्रथा पुढे चालवून कॉमेडीत साहित्य आणले आणि विडंबनाचे बीजारोपण केले. या काळातील सुखान्तिकास middle comedy असे म्हणतात. ( इ. स. पू. ३७५ ते ३२५ ) याशिवाय दुसरा एकच नाटककार माहित आहे; मेनान्दर ( इ. स. पूर्व ३४२ ते २९२ ) ह्याच्या शंभर नाटकां-पैकी संपूर्ण स्वरूपात एकच उपलब्ध आहे. शिवाय दोन नाटकांचा काही भाग उपलब्ध आहे. या नाटकांचा 'न्यू कॉमेडी'मध्ये समावेश होतो. ग्रीक comos म्हणजेच मिरवणूक आणि ode म्हणजे गीत या दोन शब्दांतून कॉमेडी हा शब्द निघाला.

## रंगभूमीचे स्वरूप

वर सांगितलेल्या ग्रीक रंगभूमीवरील वरील दोन नाट्यप्रकारांवरून एक गोष्ट स्पष्ट होते, ती ही की त्यावर धार्मिक देवता-स्तवनाची छाया होती. वसंत ऋतून होणाऱ्या मुख्य उत्सवाशिवाय आणखी तीन उत्सव करीत. जानेवारीमधील लिनिआ ( Lenaea ) आणि फेब्रुवारीमधील ॲंथिस्टीरिआ ( Anthesteria ) या दोन उत्सवांत मद्याला महत्त्व होते. त्या उत्सवांतून इ. स. पूर्व ४५० पूर्वी नाटके होत नसावीत. तिसरा उत्सव ( ग्रामीण Rustic Dionysia ) हा डिसेंबरमध्ये करीत. या निमित्त ज्या मिरवणुका निघत त्यांमधून सुखान्तिकेचा जन्म झाला.

## नाट्योत्सव, त्याचे स्वरूप

मुख्य वसंतोत्सवात डायनायससच्या देवळापासून उत्सवमूर्ती सजवून रथातून मिरवीत नेत. दिवसभराच्या मिरवणुकीत ती मूर्ती शहराबाहेर नेण्यात येई. रात्री मशालीच्या उजेडात उत्सवमूर्तीचा समारंभाने नगरात प्रवेश होई आणि ती पुन्हा मंदिरात आणीत. तिची स्थापना मंदिराबाहेर होत असावी. कारण पुढचे सहा दिवसांचे कार्यक्रम या मूर्तीपुढे होत. उत्सवाच्या दुसऱ्या आणि तिसऱ्या दिवशी डिथिरॅंब प्रकारच्या नृत्य–गायनाचे कार्यक्रम होत. यांत

दरवर्षी दहा बाऱ्यांना प्रवेश असे. प्रत्येक बारीत पन्नास, गायकनर्तक असत. पाच बाऱ्या प्रौढांच्या आणि पाच बाऱ्या मुलांच्या असत. तिसऱ्या दिवशी एक दिवस सुखान्तिकांचे प्रयोग होत. त्यांत पाच सुखान्तिका असत. नंतरच्या तीन दिवसांत दररोज तीन-तीन शोकान्तिका असत. दर दिवशी शेवटी विरुजिके (satyr) चा प्रयोग होई. या सात दिवसांच्या कार्यक्रमानंतर एक दिवस पारितोषिक समारंभ होई. त्याच वेळी नाटचप्रयोगाच्या वेळातील गैरवागणुकीची चौकशी होई.

उत्सवांतील नाटकातील नटांना शासनाकडून मोबदला मिळे त्याचप्रमाणे कपडेलत्ते, जरूर तर नेपथ्यसाधनेही शासन पुरवी. शिवाय नाटचगृह उपलब्ध करून देई नाटककारांना शासकीय अनुदान मिळे आणि यशस्वी नाटकाला खास पारितोषिक दिले जाई. उत्सवाच्या काळात न्यायालये बंद असत; इतर सरकारी व्यवहारही स्थगित असत. कैद्यांना सोडून देण्यात येई. म्हणजे हा पूर्णपणे राष्ट्रीय उत्सव होता. सुरुवातीस प्रवेश विनामूल्य असे. नंतर मामुली प्रवेशमूल्य ठेवण्यात आले. तेही ज्या रसिकांस देणे शक्य नसे त्यांची सोय करण्यासाठी एक निधी निर्माण करण्यात आला. त्यातून त्यांचे प्रवेशमूल्य भरण्यात येई. उत्सवात सर्वांना सारखे वागविले जाई. खुला प्रवेश होता. उच्चनीचविचार किंवा वर्णभेद नव्हता. रंगभूमीच्या लोकाभिमुखतेमुळे जास्तीत जास्त रसिकांना प्रवेश द्यावा लागे.

ग्रीक रंगभूमीवरील कोरस हा नट आणि प्रेक्षक यांच्यामधील दुवा होता. त्यातील पन्नास गायक-नर्तकांच्या हालचालीस बरीच जागा लागे. त्या जागेस ऑर्केस्ट्रा असे नाव होते. एका बाजूस, ऑर्केस्ट्राच्या मागे वेदी (thymele) असे, त्या बाजूस नट संवाद म्हणत. दुसऱ्या बाजूस किंवा ऑर्केस्ट्राच्या तिन्ही बाजूस टेकडीच्या उतारावर प्रेक्षक बसत किंवा उभे राहत. हेच ग्रीकांचे पहिले नाटचगृह, डॉयनायससचे नाटचगृह म्हणून प्रसिद्ध आहे.

## रंगभूमीची पार्थिव बाजू

ग्रीक रंगभूमीची यथार्थतेने ओळख करून घ्यावयाची तर ग्रीक नाटकाप्रमाणेच ग्रीक रंगभूमीच्या पार्थिव बाजूची ओळख करून घेण्याची जरूर आहे. ग्रीकांच्या नाटचगृहांचे कालानुक्रमाने तीन मुख्य भाग पडतात : इ. स. पूर्व पाचव्या शतकातील क्लासिकल अथेनियन नाटचगृहाचा पहिला भाग दुसऱ्या भागात चौथ्या शतकातील हेलेनिस्टिक (Hellenistic) नाटचगृहाचा समावेश होतो. ही नाटचगृहे जरी ग्रीस देशाबाहेर बांधलेली असली तरी

त्यांच्यावर ग्रीक नाटच वास्तुकलेची छाप होती. तिसरा भाग ग्रीक संस्कृतीच्या पडत्या काळात बांधलेल्या ग्रीको-रोमन नाटचगृहाचा. अथेन्स् शहरातील डायनायसस्चे नाटचगृह क्लासिकल सदरात पडते. परंतु आज उपलब्ध असलेल्या अवशेषावरून मूळ वास्तूचे यथातथ्य स्वरूप स्पष्ट होत नाही. ग्रीक नाटचगृहांची माहिती देण्याचा प्रयत्न व्हिट्रुव्हियस ( Vitruvius इ. स. पूर्व १५ ) आणि पोलक्स् ( Pollux इ. स दुसरे शतक ) यांनी केलेला आहे. अर्थात त्याचे लिखाण चार ते सहाशे वर्षांनंतरचे आहे.

## नाटच्यगृहाचे स्वरूप

वर सांगितल्याप्रमाणे ग्रीक नाटचगृहात कोरसच्या नाटच-गाण्यासाठी वर्तुळाकार जागा लागे. ही जागा डायनायसस् नाटचगृहात ॲक्रोपोलीस् ( Acropolis ) टेकडीच्या पायथ्याशी, मंदिराच्या पुढे होती. टेकडीच्या उतारावर बसलेल्या, किंवा उभे राहिलेल्या प्रेक्षकास पायथ्याशी असलेल्या सपाट नृत्यभूमीवरील कोरसची गीते ऐकू येत आणि नृत्याविर्भाव दिसत. ज्या भागास प्रेक्षक असत त्या भागास थियेट्रान ( theatron ) किंवा प्रेक्षागार म्हणजे 'पाहण्याची जागा' म्हणत. जिथे उतार संपतो आणि ऑर्केस्ट्राचा भाग सुरू होतो तिथे नंतर प्रतिष्ठित प्रेक्षकांसाठी लाकडी आसने मांडू लागले. या आसनांच्या मागे सर्वसाधारण प्रेक्षकांसाठी लाकडी बाके उभारण्यात येत. त्यांची उभारणी सुलभ व्हावी म्हणून टेकडीच्या उतारातील उंचसखल भाग जुन्या विटा, मडक्यांची खापरे यांनी भरून काढण्यात येई. ते काम व्यवस्थित झाले नाही तर बाके लटपटत किंवा मोडून पडत. त्याचा उल्लेख पुढे येईल. पहिल्या नाटचगृहात सुमारे १४००० प्रेक्षकांची सोय होती. सुरुवातीच्या काळी लाकडी गॅलरीवजा मागे उंच होत जाणारी बाके बांधीत. तीस वर्षांपूर्वी सांगलीस शतसांवत्सरिक नाटचमहोत्सवात गॅलरी कोसळून अपघात झाला. तशीच गोष्ट इ. स. पूर्व ४९९ मध्ये अथेन्स शहरात घडली. लाकडी बाकड्याखाली विटांच्या आणि खापरांच्या कच्चेपणामुळे हा अपघात घडला म्हणतात. या अपघातानंतर लाकडी बाकाऐवजी दगडी सोपाने बांधण्यात येऊ लागली. एका दृष्टीने हे बरे झाले. कारण माती आणि लाकूड यांचा उपयोग करून बांधलेली भरतोक्त भारतीय नाटचगृहे जशी नष्ट झाली आणि त्यांचा मागमूस उरला नाही तशी स्थिती झाली असती.

कोरसची नृत्यभूमी सुरुवातीच्या काळात पूर्ण वर्तुळाकृती असे. डॉयनायजियन नाटचगृहातील नृत्यभूमीचा व्यास ७८ फूट होता. ऑर्केस्ट्रा टेकडीच्या

पायथ्याशी उत्तरत्या भागावर बांधला असल्यामुळे समपातळी निर्माण करण्यासाठी देवीच्या बाजूस साडे सहा फूट उंच बांधून काढावे लागले. त्याच्या मागच्या बाजूस डॉयनायूससचे देऊळ होते. इ. स. पू. ४६५ पर्यंत ऑर्केस्ट्राच्या मागच्या बाजूस भिंत नव्हती त्यामुळे आश्चिलसच्या सुरुवातीच्या नाटकातील स्थळे उघड्यावर कल्पिलेली आहेत आर्केस्ट्राच्या मागे देवळाच्या बाजूचा खोलगट भागाचा उपयोग नटांच्या निर्गमनासाठी करीत. मागे देऊळ असल्यामुळे तिथे रंगमंच बांधण्यासाठी कल्पना प्रारंभी सुचली नाही.

## रंगमंचाची उत्क्रांती

इ. स. पूर्व ४६५ मध्ये नृत्यभूमी, श्रोतृगृहाकडे पन्नास फूट सरकवण्यात आली. त्यातून उपलब्ध झालेल्या जागेवर लाकडी पडवी बांधण्यात आली त्याला skene म्हणत. नटांना कपडे बदलण्यासाठी या लंबचौकोनी पडवीचा उपयोग होत असावा. नंतर त्या जागेचा रंगमंच म्हणून उपयोग होऊ लागला. या योजनेमुळे नाटकात योजावयाच्या स्थळावरील बंधने ढिली झाली आणि रंगमंचावर स्थलविशेष दाखविण्यासाठी मागच्या भिंतीचा उपयोग करण्याची कल्पना पुढे आली. नंतरच्या काळात, नाटकात राजवाड्यातील किंवा देवळाच्या पुढ्यात घडलेले प्रसंग घालता आले. इ. स. पूर्व ४२५ च्या सुमारास रंगमंचाची उभारणी दगडी पायावर करण्यात येऊ लागली. रंगमंचाच्या दोन्ही बाजूस जरा पुढे घुसलेली पाखी ( paraskenia ) बांधण्यात आली. इंग्रजीमध्ये, आणि त्यावरून मराठीमध्ये या पाख्यांना ‘विंग्ज्’ म्हटले आहे. त्यामुळे चुकीची समजूत होईल कारण आज ‘विंग्ज’ चे स्वरूप वेगळे आहे. या पाख्यांची आणि मुख्य रंगमंचाची उंची नृत्यभूमीहून हातभर असे. रंगमंचाच्या मागे लाकडी पार्टिशनवजा भिंत असे. तिला प्रोसिनियन ( proskenion ) म्हणत. या पार्टिशनमध्ये तीन दारे असत. त्यातून नट प्रवेश करीत. रंगमंचाच्या बाजूची पाखी ऑर्केस्ट्राच्या दोन्ही बाजूंनी श्रोत्यांच्या पहिल्या रांगेतील शेवटच्या आसनाच्या दिशेने पुढे जात. ती पाखी आणि शेवटची आसने यामध्ये वाटा असत. त्यांना parodoi म्हणत. श्रोते बाहेर पडण्यासाठी या वाटांचा उपयोग करीत त्याचप्रमाणे कोरसमधील गायकनर्तकही करीत. या वाटांच्या तोंडावर शिल्पयुक्त असे दरवाजे असत, कमानी बांधलेल्या असत. रंगमंचावर मजला असे. त्यास episkenion म्हणत. त्याचा उपयोग आजच्या मंडपीप्रमाणे यांत्रिक अवतरणासाठी होत असावा. प्रत्यक्ष रंगमंचास व्यासपीठ ( logeion ) असे नाव होते. हे लक्षात ठेवले पाहिजे.

या प्रकारच्या नाटचगृहांशिवाय, गुहांच्या प्रवेशद्वारी, तंबूपुढे किंवा उपवनातील वृक्षराजीच्या पुढ्यातही नाटचप्रयोग करीत. अशा ठिकाणी खडकात भोके ठेवलेली आढळून आली आहेत. त्यात खांब रोवून त्याला पडदे बांधीत असावेत. त्या मागच्या आडोशाचा, नेपथ्यगृह म्हणून उपयोग होई. भारतातील सीताबेंगा गुहेतील एका ओवरीसमोर अशी भोके सापडली आहेत. त्यावरून ते ग्रीक पद्धतीचे नाटचगृह आहे असा काही संशोधकांचा अंदाज आहे.

एपिडारॉसच्या नाटचगृहातील रंगमंचावर एक मोठे दालन आणि बाजूस दोन छोटी दालने होती. दर्शनी बाजूस मागच्या भितीपासून नऊ फुटावर खांब होते. त्यांची उंची साडेअकरा फूट होती. आणि दोन्ही बाजूस पुढे आलेली पाखी होती. इथेट्रिया येथील नाटचगृहात नृत्यभूमीखालून रंगमंचावर जायला वाट असे. कोरसमधील पात्रांना यामार्गे रंगमंचावर जाता येत असावे. हेलेनिस्टिक नाटचगृहात रंगमंच नृत्यभूमीपासून उंचावर असे आणि त्यावर दर्शनी बाजूस नऊ ते तेरा फूट उंचीचे खांब असत. खांबाच्या मागे आठ ते दहा फुटावर मागच्या दुमजली इमारतीची भिंत असे. पुढच्या दोन खांबामागे रंगवलेले लाकडी तक्ते बसवीत. त्या तक्त्यापुढे उभे राहून नट आपली भाषणे म्हणत, की खांबाच्या वर लाकडी रंगमंच असे त्यावर नट वावरत याबाबत निर्णायक पुरावा सापडलेला नाही. त्या काळी बांधलेल्या नाटचगृहाचे जे अवशेष आहेत त्यात पहिल्या मजल्यावरील लाकडी भाग आता राहिलेला नाही. फक्त खांब उभे आहेत. इटलीमधील पॉम्पे शहराच्या उत्खननात सापडलेली दोन्ही नाटचगृहे मी पाहिली. ( इ. स. पूर्वीची ) त्यात खांबाच्या पुढे उभे राहून भाषण करायला पुरेशी जागा दिसत नाही. दोन खांबामागे उभे राहून नट भाषण करू लागले तर बाजूच्या प्रेक्षकांना खांब आड आल्यामुळे दिसणार नाही. ऐकूही कमी येईल. यावरून खांबावरील लाकडी तक्तपोशीवर उभे राहूनच नट भाषण करीत असावेत असे वाटते. प्रेक्षागारातील सोपाने गॅलरीप्रमाणे एकामागे एक दीड दीड फूट उंच होत जातात. शेवटचे आसन रंगमंचावर उभ्या असलेल्या नटाच्या डोक्याच्या पातळीहून आठदहा फूट उंचीवर असावे. रंगमंच पहिल्या मजल्यावर कल्पिला तर त्याची उंची १०–१२ फूट, नटाची उंची, उंच चढाव आणि उंच मुखवटे लक्षात घेता सातआठ फूट येते, गॅलरीमधील शेवटचे सोपान २५–३० फुटावर असावे.

ग्रीकांचे सुधारित नाट्यगृह

हेलेनिस्टिक नाटचगृहामध्ये ग्रीकांच्या मूळ नाटचगृहामधील नृत्यभूमीचे पूर्ण वर्तुळाकृती स्वरूप जाऊन पाऊण वर्तुळाचे स्वरूप आलेले होते. श्रोतृगृह

मात्र पूर्वीपासूनच अर्धवर्तुळाहून थोडे मोठे होते. रंगमंचाच्या मागे भिंत असे असे सांगितले. या भिंतीस प्रोस्केनियन म्हणत. भिंतीपुढे असलेल्या खांबावर आठ-दहा फूट रुंद मुख्य रंगमंच असे. त्याच्या मागील भिंतीला एपिस्केनियन म्हणत भिंतीला मागे दोन दारे असत. रंगमंच फार उंचावर गेल्यामुळे नट आणि कोरस यांच्यातील संबंध दुरावत गेला. इ. स. पूर्व दुसऱ्या शतकापासून ट्रॅजेडी-मधून कोरसचे महत्व कमी कमी होत गेले तर कॉमेडीमध्ये त्यास अवांतर करमणुकीचे स्वरूप आले.

ग्रीको-रोमन नाट्यगृहांचे एक वैशिष्टच म्हणजे ऑर्केस्ट्राच्या पूर्ण वर्तुळाकारावर रंगमंचाचे आक्रमण. हेलेनिस्टक नाट्यगृहात रंगमंच श्रोतृगृहात पुढे पुढे सरकत होता तो आता ऑर्केस्ट्राच्या पूर्ण वर्तुळाच्या साधारण मध्यापर्यंत येऊन ठेपला. रंगमंचाच्या तोंडावर (Stagefront) नक्षीदार काम दिसू लागले. त्या काळात कॉमेडी लोकप्रिय होती. ग्रीक रंगमंचावरील उंच पहिल्या मजल्यावरील अभिनय कॉमेडीच्या घरगुती स्वरूपाला सत्याभासाला पोषक नव्हते. त्यामुळे त्यात बदल करीत गेले. पहिल्या मजल्याची उंची कमी होत गेली. आणि रंगमंचाची खोली-दर्शनी भागापासून मागच्या भिंतीपर्यंतचे अंतर- वाढली. वीस फुटांपर्यंत गेली. मागच्या भिंतीवर उठावदार शिल्प कोरण्यात आले. भिंतीतील तीन दरवाजांत आणखी चारांची भर पडली. रंगमंचाच्या खालून ऑर्केस्ट्रावर जायला वाट ठेवण्यात आल्याचे त्या काळी तीन नाट्यगृहाच्या अवशेषांवरून दिसते.

## रंगभूमीवरील कोरस

ग्रीक रंगभूमीवर पहिली काही शतके तरी कोरसचे प्राबल्य होते. त्याचा नाट्यलेखनावर परिणाम झालेला आहे. कोरसमध्ये गायकनर्तक असत. परंतु नाट्यप्रयोगाच्या सोईसाठी त्यात Councillors, Confidents किंवा faithful retainers यांचा समावेश करण्यात आला. त्यांना नाटकात विशेष काम देण्यात आले उदा० Furies ऑस्किलसच्या Eumenides मध्ये कोरसातील पात्र पक्षी बनत, तर कधी ढग बनत. कारण देवाचे नव्हते. कोरसमधील पात्रे मुखवटेही वापरीत चित्रविचित्र पोषाख करीत. त्यामुळे ती प्रेक्षकांपासून वेगळी पडत. शोकांतिकेतील कोरसची प्रतिक्रिया प्रेक्षकांना सूचना देणारी असे. त्यांची गाणी प्रेक्षकांना माहीत असत. कोरसमध्ये काम करणार नट हौशी मंडळीतून निवडीत. परंतु त्यांनी आपल्या कामाचे शिक्षण घेतलेले असे. कधी कधी कोरसमधील पात्रे रंगमंचाच्या इमारतीतून प्रवेश करीत. उदा० Cloephori

आणि Eumenides. जी गोष्ट नटांना रंगमंचावर दाखवता येत नसे त्याचे कोरस वर्णन करी. उदा० अन्टीगनीमध्ये Ismene च्या चेहऱ्यावरून ओघळणारे अश्रू आणि विद्रुप झालेले लाल गाल.

रंगमंचावरील प्रयोगप्रक्रिया

ग्रीक नाटचगृहातील रंगमंच सुरवातीच्या काळात उघडे असत असे वर सांगितले. मागल्या बाजूस भिन्त नसे. पुढे ती बांधण्यात आली. त्या भिंतीस दारे टेवण्यात आली. इ. स. पू. ४२५ मध्ये पेरिक्लियन ( Periclean ) बांधणीच्या वेळी ही सुधारणा झाली. त्या वेळी रंगमंचाची रुंदी २४ फूट होती असे म्हणतात. प्रथम भिंतीत एकच मोठे दार ( सुमारे १२ फूट रुंद ) असावे. मागाहून दोन्ही बाजूस अरुंद दारे करण्यात आली. मधल्या दारातून राजे-रजवाडे यांचे प्रवेश होत. उजव्या बाजूच्या दारातून दुय्यम पात्रे प्रवेश करीत. त्या बाजूस पाहुण्यांसाठी खोल्या आहेत असा संकेत होता. डाव्या बाजूच्या प्रवेशद्वारातून नोकर-चाकर प्रवेश करीत. त्या बाजूस ओसाड भाग, तुरुंग, मोडके वाडे पडकी मंदिरे इत्यादी वास्तू आहेत, अशी कल्पना होती. ही तीन दारे असलेली भिंत रंगमंचाच्या इमारतीची दर्शनी भिंत होती. त्यामुळे दारातून होणारे प्रवेश हे राजवाड्यांतून, घरांतून, अगर देवळांतून होत आहेत असा नाटकपरत्वे संकेत होता मधल्या दाराच्या बारा फूट रुंदीमुळे त्याच्या मागे काही प्रसंग दाखवता येत. उदा० Bacchae मधील पॅलेस मिरॅकल. याशिवाय रंगमंचाच्या दोन्ही बाजूस जाता येई. हे निर्गमन बाजूच्या पाख्यांत होई. एका बाजूला गावातील चव्हाटा ( forum ) आणि दुसऱ्या बाजूस गावाची वेस आहे असे मानले जाई. रंगमंचाच्या दर्शनी भिंतीसमोर जे खांब असत त्यांच्यामध्ये लाकडी तवते उभे करीत ( Pinakes ). नाटकातील प्रसंगानुरूप देखावे त्यावर रंगवता येत. सॉफॉक्लिसच्या काळात रंगीत देखावे होते असे ॲरिस्टॉटल म्हणतो. वरील बाजूच्या दारासमोर त्रिकोणी ठोकळे (Periakloi) उभे करीत. ठोकळ्यांच्या तीन बाजूस तीन वेगवेगळे देखावे रंगवलेले असत. हे ठोकळे आसावर फिरवून देखाव्यात बदल करता येत असे. देखाव्याबाबत जाणत्यांत फारशी उत्सुकता नसे. त्यांच्यामुळे नाटकाची परिणामकारकता वाढते हे त्यांना मान्य होते. परंतु नाटचप्रयोगाची यशस्विता कवि–कौशल्यावर अवलंबून असते, असे मत प्रचलित होते. त्याचा अनुवाद ॲरिस्टॉटलने केला आहे. इतकेच नव्हे तर देखाव्यावर अवलंबून राहणारा नाटककार कमी प्रतीचा, असे त्यांचे मत होते झटकन देखावे बदलण्यासाठी ग्रीक अनेक क्लृप्त्यांचा उपयोग करीत. दाराच्या आत कोपऱ्यावर फिरवता ( ekkuklein to rollout ) येणारी घडवंची असे.

ती एकदम दारात सरकवता येत असे. ॲरिस्टोफेनिस्‌च्या Ach 408f आणि Thesm 95f मध्ये यांचा उल्लेख आहे. या प्रकारे आतल्या घटना प्रेक्षकांपुढे आणता येत असत. मराठी रंगभूमीवर अशाच काहीशा प्रकारे 'राजसंन्यास' नाटकात संभाजीपुढे शिवाजीचे दर्शन घडते.

ग्रीकांच्या नाटकांतून वापरात असलेल्या या घडवंचीला ( Exaustra ) चाके असत. इलेक्ट्रा नाटकात राणीच्या प्रियकराचा खून झाल्यावर त्याचे शव अशाच घडवंचीवरून प्रेक्षकांसमोर आणीत असावेत. अर्थात ही सोय सुरुवातीस नव्हती. ती हेलेनिस्टिक नाट्यगृहाच्या बांधणीमुळे शक्य झाली. या घडवंचीचा आकार काय होता हे माहीत नाही. याशिवाय घडवंचीहून मोठ्या प्लॅटफॉर्मचा वापर होत असे. याचा आकार सहा फूट रुंद आणि दहा फूट लांब असा असावा असा तर्क आहे. अशा प्लॅटफॉर्मवर एकाहून जास्त पात्रे आणि वस्तू असू शकतात. त्यांचा उपयोग Agamemnon आणि Eumenides त्याचप्रमाणे क्लाऊड-स्मधील सॉक्रेटिस आणि शिष्य यांची मूक दृश्ये दाखविण्यासाठी होत असावा. लंडनच्या ओल्डव्हिक रंगभूमीवर मायकेल सेन्ट डेनी या फ्रेंच दिग्दर्शकाने निर्माण केलेल्या इलेक्ट्राच्या प्रयोगात चाके लावलेल्या चौपाईवरून राणीच्या प्रियकराचे शव बाहेर आणीत हे मी पाहिले आहे.

## रंगभूमीवरील तांत्रिक प्रगती

ग्रीक नाट्यगृहात रंगमंचावरील मंडपीमध्ये कप्पी ( machina ) बसवून माणसे किंवा वस्तू रंगमंचावर सोडता येत किंवा वर नेता येत Andromeda मध्ये Persens मध्ये स्वर्गातून पंखाच्या सहाय्याने उडत जातो. नाटककाराला नाटकातील काही कठीण प्रसंग सोडवण्यासाठी देवांना रंगमंचावर आणावे लागे. अशाप्रकारे शेवट करणाऱ्या पद्धतीस dens ex machina असे संबोधण्याची पद्धत पडली. ॲरिस्टोफेनिस्‌च्या नाटकात आकाशात, ढगात, सॉक्रेटीस् दाखवत. तो एका टोपलीत बसवून यारीच्या साहाय्याने खाली सोडीत असत. तुकारामाचे वैकुंठगमन याच प्रकारे मराठी रंगभूमीवर दाखवीत असत हे जुन्या प्रेक्षकांना आठवत असेल.

रंगमंचावरील मंडपीतून एक टांगता झोपाळा ( theslogeion) सोडून त्यावर देवाचे प्रवेश दाखवत. आश्चिलस्‌च्या Psychostasia मध्ये Zeus तुला करतो तो प्रसंग या झोपाळ्यावरच दाखवत असावेत. रंगमचावरील एखादे पात्र वा वस्तू झटकन् दृष्टीआड करण्यासाठी यारीचा ( क्रेन ) उपयोग करण्यात येत असे. शिवाय अदृश्य दारे सोडून पात्रांचे अवतरण दाखवत.

सुखान्तिकेमध्ये मशिनची जागा अंजिराची फांदी ( Krade ) घेई, असे पोलक्स म्हणतो. आजच्या प्राम्टर गॅलरीप्रमाणे स्कोप ( skope ) नावाची एक उंच जागा असे. तिथे बसून दिग्दर्शक नाट्यप्रयोगाचे नियंत्रण करीत असावा असा तर्क आहे. संशयकल्लोळ नाटकात कृत्तिका खिडकीतून खाली रस्त्यावर फाल्गुनराव रेवतीची सलगी पाहते तशा तऱ्हेची खिडकी (का भित?) ( Teichos ) आणि सौध ( Purgos किंवा Tower ) ग्रीक रंगमंचावर दाखविता येत पोलक्सने बिकन ( beacon ) टॉवरचा उल्लेख केलेला आहे. ( Phruktorion ) शेक्सपीयरच्या ग्लोब नाट्यगृहात पहिल्या मजल्यावर नाट्यप्रसंग दाखवता येत. तशा तऱ्हेचा मजला (Distegia) ग्रीक रंगमंचावर होता. ही जागा घराच्या छपरावरही असू शकेल. Agamemnon मध्ये सुरुवातीसच "lying on my elbows on the roof of the Atreidae" असा उल्लेख आहे. Acharnians मध्ये D kaiopolis ची बायको पतीची मिरवणूक पाहते.

रंगभूमीवरील यांत्रिक साधने

ग्रीक रंगभूमीवर यांत्रिक साधनाचा (machane) वापर होत असे. विजेचा लखलखाट दाखवण्याचे साधन होते ( keraunok opeion ). एका फलकावर हे दृश्य रंगवून रंगमंचावर उभे करीत. त्या वेळी गडगडाट ऐकवण्यासाठी brouteion नावाचे यंत्र होते. हे यंत्र म्हणजे एका मोठ्या धातूच्या रांजणात दगड ओतण्याची व्यवस्था. आजच्या सायक्लोरामाप्रमाणे दूरचे देखावे दाखवण्याची व्यवस्था असे. याशिवाय फिरत्या रंगमंचाची ( stropheion revolving machane ) व्यवस्था असावी असा इतिहासकारांचा तर्क आहे. रंगमंचावरून खालील तळघरात उतरता येई आणि तिथे ठेवलेल्या वाटेतून ऑर्केस्ट्रावर प्रवेश करता येत असे; किंवा आतल्या बाजूस नेपथ्यगृहात जाता येई. पुढे या तळघरातून पाळणे (piesmata=lifts ? ) वर आणू लागले. आजच्या पाश्चात्य रंगमंचावर अशा पाळण्यांचा कौशल्यपूर्ण उपयोग करीत असतात. वरील वर्णनावरून ग्रीक रंगभूमीवर देखावे असत, स्टेज ट्रिक्स्चा अवलंब करीत आणि यांत्रिक साधनेही वापरीत हे स्पष्ट होते. परंतु एकतर ही प्रगती नंतरची होती आणि सार्वत्रिक नव्हती. याची जी वर्णने आली आहेत ती पोलक्सच्या लिखाणातील आहे. त्यात इ. स. दुसऱ्या शतकापर्यंतची परिस्थिती लक्षात घेतलेली दिसते. काही गोष्टी रंगभूमीवर दाखविणे निषिद्ध होते. उदा० वध. वधाची वार्ता निरोप्याकरवी सांगण्यात येत असे. काही नाटकातून आतल्या बाजूस झालेल्या वधाची सूचना

किकाळ्यावरून मिळे. आणि मृत व्यक्तीचे शव घडवंचीवरून प्रेक्षकांच्या नजरेसमोर आणण्यात येई.

## कोरस. त्याचे स्वरूप आणि कार्य

ग्रीक रंगभूमीची सुरुवात डिथिरँब नृत्यगायनातून झाली. हा भाग कोरस म्हणून पुढे चालू राहिला. कोरस म्हणजे गायक-नर्तक वृंद. परंतु मूळ कोरस हे नावच वापरणे बरे. कारण वृंद शब्दावरून योग्य बोध होणार नाही. नाटकाला पोलॉग किंवा नांदीनंतर सुरुवात होई. आणि मग कोरस प्रवेश करी. त्यांच्या गायनाने आणि नृत्यमय हालचालीने नाटकाची पार्श्वभूमी सूचित होई. कोरसला अनेक कामे सांभाळावी लागत. नाटक चालू असताना रंगमंचावर घडणाऱ्या घटनांवर भाष्य करणे, सल्ला देणे. तर काहीवेळा त्या घटनांमध्ये हस्तक्षेपही कोरस करी. कोरसमधील पात्रांच्या संख्येवर बंधन होते सुरुवातीस कोरसमध्ये पन्नास पात्रे असत. त्यांच्या हालचालीसाठी साठ ते सत्तर फूट व्यासाची भूमी. ऑर्केस्ट्रा राखून ठेवलेली असे. हे कोरसचे महत्त्व ग्रीक नाटककारांना आवडत होते असे दिसत नाही. यूरिपिडीसने याबाबत उघड असमाधान व्यक्त केले आहे. नाटककारांची अडचण समजण्यासारखी आहे तरी त्यांना प्रत्यक्ष नाटकात कोरसच्या अस्तित्वाची दखल घ्यावीच लागे व समर्थनही करावे लागे. कल्पक नाटककार प्रयोगात खास कामही देत, रंगमंचावर घडत असलेल्या घटनांचा कोरस उल्लेख करी. आश्चिलसने आपल्या suppliants मध्ये कोरसला Danaus च्या पन्नास मुलींची भूमिका दिली आहे. नाटकातील पहिल्या नटाशी ( Protagonist ) कोरस समरस झालेला काही नाटकात दिसे. सॉफॉक्लिसच्या नाटकात कोरस नाटकातीलच एक पात्र असल्याप्रमाणे वागतो. युरिपिडीसच्या नाटकात कोरसचा उपयोग फक्त गायनासाठीच मर्यादित झाला.

नाटकात घडणाऱ्या घटना समानपातळीवरून प्रेक्षकांना समजावून देण्याचे काम कोरस करी. पुढे कोरसमधील पात्रांची संख्या कमी करण्यात आली त्याचे प्रमुख कारण असे होते की प्रत्येक नाटकास पन्नास पात्रांचा कोरस पुरवणे अवघड झाले. दर दिवशी चार नाटके व्हावयाची. त्यांना आठदहा तास लागत. इतका वेळ एक कोरस चालत नसे. चार कोरस लागत हा कोरस पुरवण्याचे काम कोणातरी धनिकाकडे सोपवीत. म्हणजे उत्सवात सतरा धनिकांना भुर्दंड. एकाच कोरसाचे चार भाग पाडून प्रत्येकात बारा पात्रेच ठेवण्याची कल्पना पुढे आली. सॉफॉक्लिसच्या काळात ही संख्या पंधरापर्यंत वाढवली. सोईप्रमाणे

नाटकाच्यावेळी या कोरसचे सात सात पात्रांचे दोन गट केल्याचे दिसते. कोरसच्या प्रमुखाला coryphaens म्हणत. इ. स. पूर्व दुसऱ्या शतकात कोरसची संख्या सुखान्तिकांच्या बाबतीत फक्त चारवर आली आणि मग तर दुःखान्तिकांतून कोरसची हकालपट्टीच झाली. कॉमेडीमध्ये कोरस मधूनमधून गैरहजर असे.

नाट्यवस्तूतील नैतिक बाजू कोरस स्पष्ट करी आणि नाटककाराच्या मतांना पुष्टी देई. त्याचप्रमाणे श्रोत्यांच्या प्रतिक्रिया स्पष्ट करी. दोन अंकामध्ये करमणूक करणे आणि घटनांचा सांधा जुळवून देणे ही कामे कोरसची असत. नृत्य-गायनात कोरसला पुष्कळ स्वातंत्र्य असे असे ग्रीक नाटके वाचून वाटते. पात्रांचे स्वभावविशेष स्पष्ट करणे आणि action बाबत मानदंड घालून देण्याचेही काम कोरस क्वचित करी. त्याचप्रमाणे आदर्श श्रोत्याचीही भूमिका वठवी. नाटकाचा 'मूड' कोरसच्या नृत्य-गायनातून व्यक्त होत असे. त्याच्या अनेक पात्री बांधणीमुळे आणि भव्यतेमुळे बहुरंगित्वामुळे, नयनरम्य लयबद्ध हालचालीमुळे नाट्यप्रयोगास आकर्षक दृश्य स्वरूप प्राप्त होत असे. थोड्याशा पात्रांकडे सारखे पाहत राहण्यामुळे येणारा कंटाळा कोरसमुळे वाटत नसे. उलट प्रेक्षकांना आराम मिळे आणि दहा दहा तास बसून राहणे सुसह्य होई.

## रंगभूमीवरील मर्यादा

ग्रीकांची नाटके दिवसा सूर्यप्रकाशात होत. सूर्योदयाच्या सुमारास नाटकास सुरवात होत असे. काही नाटकांच्या प्रारंभी सूर्योदयाचा उल्लेख केला आहे. दिवसाच्या बारा तासापैकी मध्यंतरात दोन तास गेले तर दहा तासात तीन दुःखान्तिका आणि एक सटायरचा प्रयोग होई. मराठी रंगभूमीवर दुःखान्त नाटकानंतर एक फार्स करण्यात येई त्याची येथे आठवण व्हावी. प्रेक्षकांची आसने रंगमंचापासून ७० फुटांवर सुरू होत. शेवटचे सोपान ३०० फुटावर असे. त्यामुळे नट बाहुल्यांसारखे दिसत. पहिल्या रांगेतील प्रेक्षकांना नट चारपाच इंच उंच वाटत तर शेवटच्या रांगेतील प्रेक्षकांना ते आंगठ्याएवढे दिसत. ही उणीव थोडीतरी भरून काढण्यासाठी उंच टाचेची पादत्राणे आणि उंच शिरोभूषणे वापरीत. मुखवट्याचा वापर अवश्य असे. कारण, चेहऱ्यावरील भाव दिसत नसत. भूमिकांनुसार मुखवटे वापरीत. मुखवट्यांचा दुसरा उपयोग म्हणजे पात्रांची भाषणे ऐकू जातील अशा प्रकारे रचना.

अनुक्रमणिका

मुखवटे, वेषभूषा, प्रयोजन आणि व्यवहार

वेषभूषेमधील महत्वाचा उपयुक्त ( functional ) भाग म्हणजे उंच पादत्राणे ( cothurnus embatos किंवा krebas ) उंच शिरोभूषणे ( onkos ) आणि मुखवटे. मुखवट्यावरून नटाची भूमिका स्पष्ट होई. राजे लोकांचे मुखवटे उंच असत. नोकरचाकरांचे त्याहून कमी उंच तर कोरसचे चेहऱ्याच्या आकाराचे असत. दुःखान्तिकेतील पात्रे अतिशयोक्त (distorted) मुखवटे घालीत. मुखवटे हलके असणे आवश्यक होते त्याच्या बनावटीत कापड बूच आणि हलक्या लाकडांचा वापर करीत असत हालचालींना अडथळा होऊ नये, त्वरित बदलता यावेत अशी त्यांची बनावट असे. उंच चढावांनी आणि उंच मुखवट्यांनी, शिरोभूषणांनी वाढलेल्या उंचीस शोभेशी अंगलट असावी म्हणून छाती पोट हातपाय यांना गादीचे पट्टे बांधून वर अंगरखा घालीत. अलीकडे उपलब्ध असलेली मायक्रोफोनसारखी श्रवणोपयोगी कृत्रिम साधने नसल्यामुळे मुखवट्यातील तोंडाचाच आवाज फेकण्यास वापर करावा लागे.

पायघोळ रंगीत कशिदा काढलेले अंगरखे ( chiton ) घालण्यात येत. त्यांच्या बाह्या मनगटापर्यंत असत. प्रत्यक्षात कंबरपट्टा पोटावर असे तर रंगभूमीवर नट तो छातीजवळ बांधीत. याचे कारण नटाची वाढवलेली उंची. अंगरख्यावर विविध आकृत्या आणि प्राण्यांची चित्रे काढलेली असत, अंगरख्यावरून cloak, मराठी रंगभूमी धैर्यधर घालतो त्या प्रकारचा घालीत आणि शिवाय उपरण्यासारखे उत्तरीय घेत. उपरण्याचे रंग सांकेतिक असत. त्यावरून भूमिकांचा व्यवसाय आणि समाजातील स्थान स्पष्ट होत असे. दुःखी भूमिका, करडे, फिके, रंग वापरीत. राणी जांभळा दुपट्टा घेई. इहलोकातील माणसे आणि दिव्य लोकातील माणसे यांच्या वेषभूषेत फरक असे. राजे मुकुट वापरीत, पर्शियन टर्बन घालीत. वृद्धांच्या हातांत सोटा असे. पुरुष आणि स्त्रीपात्रे वेगवेगळी दिसावी. म्हणून त्यांच्या पोषाखात फरक करीत. स्त्रियांचे अंगरखे पायाच्या घोट्यापर्यंत असत. पुरुषांचे गुडघ्यापर्यंत असत.

अभिनयपद्धती

ग्रीक रंगभूमीवर नटांची अभिनयपद्धती कशा प्रकारची होती ते समजण्यास निर्णायक पुरावा नाही. एकच नट एकाहून जास्त भूमिका वठवीत असे, स्त्रीभूमिकासुद्धा पुरुषच करीत असत. मधूनमधून कोरसची प्रतिक्रिया, गायन, नृत्य यांत जाणारा वेळ भरदिवसा सूर्य-प्रकाशात घडणाऱ्या सर्व घटना, इत्यादी गोष्टी लक्षात घेतल्या असता ग्रीक रंगभूमीवरील अभिनयपद्धती स्वाभाविक

असणे शक्य दिसत नाही. अक्षरशः हजारो प्रेक्षकांसमोर नाटक करावयाचे असल्यामुळे आणि प्रेक्षागृह प्रचंड आकारामुळे नट बाहुल्यासारखे दिसत त्यांच्या मुद्राभिनयाचा प्रश्नच नसे. शारीरिक हालचालीतील बारकाव्यांचा काही उपयोग नसे. त्यामुळे नाटककाराचा शब्द श्रोत्यांपर्यंत पोहचवायचा इतकेच काम उरे रंगमंच आणि प्रेक्षागृह यातील अंतर लक्षात घेता देखाव्यातील बारकावे निरर्थक ठरत. परिणामतः ग्रीक रंगभूमी श्राव्य होती. फक्त ढोबळ मानानेच दृश्य होती. आणि ग्रीक नाटकांचे रसग्रहण श्रोत्रेंद्रियावर अवलंबून होते. श्रोत्यांचीच सोय पाहिली जाई आणि दहा तास बसून श्रवण करणे काव्यमय भाषेमुळे शक्य होई. ग्रीक नाट्यवाङमयावर व्यवस्थितपणे लिहिलेला जुन्यात जुना ग्रंथ म्हणजे ॲरिस्टॉटलचे काव्यशास्त्र. हा ग्रंथ सूत्रमय आहे. अनुकृतीचे प्रकार म्हणून त्याने महाकाव्य, शोकान्तिका, सुखान्तिका, डिथिरँबिक काव्य आणि मुरली व वीणा यांच्या संगीताचे बहुतेक प्रकार यांचा समावेश केला आहे. ॲरिस्टॉटल म्हणतो :

> " शोकान्तिका–आणि त्याप्रमाणे सुखान्तिका–ही प्रथम निव्वळ शीघ्र-रचना होती. पहिलीचा उगम डिथिरँब रचणाऱ्यापासून झाला आणि दुसरीचा उगम आपल्या पुष्कळ शहरांतून अजूनही रूढ असलेल्या लिंगगीता-पासून झाला; शोकान्तिकेची प्रगती हळूहळू क्रमाक्रमाने होत गेली; दृश्यमान झालेल्या प्रत्येक नवीन घटकाचा विकास केला गेला. पुष्कळ संक्रमणातून गेल्यानंतर तिला तिचे नैसर्गिक स्वरूप प्राप्त झाले आणि तिथे ती थांबली "

करंदीकर–पान ५९

महाकाव्य आणि शोकान्तिका यांच्यामध्ये काव्यात्मक अनुकृती हे साम्य दाखवल्यावर शोकान्तिकेला असलेले कालाचे बंधन, की जे महाकाव्यात नसते. ही गोष्ट वैधर्म्य म्हणून सांगितली आहे. शोकान्तिकेचे वैशिष्ट्य सांगताना ॲरिस्टॉटल म्हणतो :

> " शोकान्तिका ही गंभीर, स्वयंपूर्ण व विशिष्ट आकारमान असलेल्या कर्मांची अनुकृती असते; तिची भाषा प्रत्येक प्रकारच्या कलात्मक अलंकाराने विभूषित असते. आणि त्याचे निरनिराळे प्रकार नाटकाच्या वेगवेगळ्या विभागात सापडतात; ती नाट्यरूप असते, निवेदनात्मक नसते आणि ती करुणा व भीती ह्याच्या सहाय्याने त्या भावनांचे योग्य ते विरेचन ( katharsis ) घडवून आणते. "

"आता ज्या अर्थी शोकान्त अनुकृतीमध्ये नाटय वठविणाऱ्या व्यक्तींचा अंतर्भाव होतो, त्या अर्थी, अनिवार्यपणेच पहिल्या प्रथम दृश्य साधने हे शोकान्तिकेचे एक अंग ठरते, त्यानंतर गीत आणि शब्द Diction योजना येतातः कारण ती अनुकृतीची माध्यमे असतात." – पान ६२

इथे शोकान्तिकेचे व्यवच्छेदक लक्षण दृश्यसाधने असे सांगितले आहे शोकान्तिकेची प्रत निश्चित करणारी सहा अंगे सांगितली ती "कथानक, स्वभाव, शब्दयोजना, विचार, दृश्य व गीत" अशी आहेत. "दृश्य साधने" हा शब्द महत्त्वाचा आहे. परंतु त्याच्या व्याप्तीबद्दल मतांतरे आहेत. सर्वसाधारणपणे पात्रे. त्याची वेशभूषा आणि देखावे म्हणजे रंगमंचावरील सम्यक् दर्शन ( Spectacle ) शोकान्तिकेचे साध्य प्रसंग आणि कथानक असे दिले आहे. याबाबत दृश्य" विशद करताना ॲरिस्टॉटल म्हणतो :

"दृश्यांना अर्थातच एक स्वतःचे असे भावनात्मक आकर्षण आहे: परंतु सर्व अंगामध्ये ते किमान कलात्मक आणि काव्यकलेशी कमीत कमी संलग्न आहे. कारण आमची खात्री आहे की, शोकान्तिकेचा प्रभाव प्रयोग व नट याच्या व्यतिरिक्तही जाणवतो. शिवाय दृश्यात्मक परिणामाची निर्मिती कवीच्या कलेपेक्षा बव्हंशी नेपथ्यविशारदाच्या कलेवरच अवलंबून असते."

· पान ६५

दृश्यात्मक परिणामाची निर्मिती नेपथ्यविशारदाच्या कलेवर अवलंबून असली तरी त्यामुळे जर रसपरिपोष होत असेल, नाटककाराचा शब्द परिणामकारक होत असेल आणि प्रेक्षकांना नाटयसन्मुख करीत असेल तर त्यात गैर काय आहे? परंतु इथे ॲरिस्टॉटलच्या प्रतिपादनावर टीका करण्यापेक्षा त्याच्या काळापर्यंत व्यक्त झालेलं ग्रीक रंगभूमीचे स्वरूप समजून घ्यायचे आहे. या संदर्भात प्रा. करंदीकरानी भरतनाटय शास्त्रान्तर्गत दृश्य परिणामाबाबतच्या विवेचनाची आठवण करून दिली आहे. त्यांचा हा विषय नव्हता म्हणून त्यांनी या विचाराचा विस्तार केलेला नाही. परंतु तो फार महत्त्वाचा आहे. त्यावरून ग्रीक रंगभूमी आणि जवळजवळ समकालीन भारतीय रंगभूमी यामधील अंतर स्पष्ट होते. ग्रीक रंगभूमी श्राव्य होती. भारतीय रंगभूमीवर श्राव्य आणि दृश्य भागाला सारखे महत्त्व दिले आहे. आणि म्हणून आधुनिक रंगव्यापारांशी भारतीय रंगभूमी जास्त जवळची आहे ही गोष्ट लक्षात घेतली पाहिजे.

ॲरिस्टॉटल साहजिकच तत्कालीन ग्रीक रंगभूमीच्या स्वरूपाचे समर्थन करीत आहे. त्याच्या पोएटिक्स्‌मध्ये काव्यकलेचे विवेचन ही गोष्ट महत्त्वाची

असल्यामुळे श्राव्य भागाला त्याने प्रधानस्थान दिले ते सयुक्तिक आहे. ॲरिस्टॉटल पुढे म्हणतो :

" भीती व करुणा दृश्यात्मक साधनांनीही निर्माण होऊ शकतील; पण ती त्या लिखाणाच्या अंतर्गत रचनेचाही परिपाक असू शकतात, आणि ही पद्धती अधिक चांगली असून श्रेष्ठ कवीला शोभणारी अशी असली पाहिजे की डोळ्याच्या मदतीशिवाय सुद्धा कथा ऐकणारा मनुष्य घडणाऱ्या गोष्टीमुळे भीतीने थरारेल आणि दयेने विरघळून जाईल. ईडिपसची कथा ऐकून आपणावर असाच परिणाम व्हावयास पाहिजे. पण हा परिणाम नुसत्या दृश्यांनी घडवून आणणे ही पद्धती कमी कलात्मक आणि बाह्य साधनांवर अवलंबून राहणारी आहे." — पान ७५

इथे काव्याहून दृश्यसाधनांवर अवलंबून राहणे ही गोष्ट ॲरिस्टॉटल कमी महत्वाची मानतो हे स्पष्ट होईल. त्याचा शेवटी असा अभिप्राय आहे की,

महाकाव्याप्रमाणे शोकान्तिकासुद्धा अभिनयावाचून परिणामकारक असू शकते. केवळ वाचनानेसुद्धा तिला आपली शक्ती प्रगट करता येते. तेव्हा जर ती इतर सर्व बाबतीत श्रेष्ठ असेल तर आमच्या मताने हा काही तिचा अंगभूत दोष नव्हे." — पान १०७

[ 'ॲरिस्टोफिनिझच्या सुखात्मिका' या ग्रंथाची प्रस्तावना ]

  












श्री. शरद पाटील

# स्त्रीराज्य : ६ :

(उत्तरार्ध)

इ० स० च्या तिसऱ्या ते सहाव्या शतकांपर्यंत दक्षिण भारताला, नीलकंठ शास्त्रींच्या शब्दात, एक 'अंधकार युग' (कलि-अरशर) व्यापते. पण त्यांचे हे निदान खुद्द त्यांचेच वर्णन सिद्ध करायला असमर्थ ठरते-

'या अंधकारयुगाचे एक लक्षण बौद्धवादाचा, व बहुधा जैनवादाचाही, पगडा हे जसे होते, तसेच दुसरे लक्षण म्हणजे तामिळमध्ये वाङ्मयरचनेला आलेले महान् उधाण हे होते. या काळात 'अठरा गौण कृतीं'प्रमाणे शिलप्पदिकारम्, मणिमेकलाई इत्यादी कृतींची रचना झाली. या लेखकांपैकी अनेकजण अब्राह्मणी सांप्रदायांचे अनुयायी होते.' [७९]

'शिलप्पदिकारम्' या महाकाव्याचा कर्ता इळंको-अथिकल हा होता. त्याने आपला भाऊ सेन्गुत्तुवान् (इ. स. ९०-१२५) याच्यासाठी चेरच्या सिंहासनावरचा हक्क सोडला व तो जैन श्रमण बनला. [८०] अथिकल हा एक राजकिताब आहे. त्रावणकोरचे राजे वेणाट्ट्-अथिकल थिसव्-अथिकल अशी बिरुदे लावीत. [८१] पद्मनाभ मेनन इळंकोचा अर्थ भिक्षु वा श्रमण असा करतात. [८२] सेन्गुत्तुवान्च्या राणीचे नाव इळंको वेन्माल असे होते. [८३] याचा स्पष्ट अर्थ हा की ही राणी पुरोहिताही होती. कनकसभाइ आपल्या 'द तामिल्स् एटीन हंड्रेड इअर्स अॅगो' [८१अ] मध्ये म्हणतात की प्राचीन दक्षिणेतले राजे व योद्धे वृद्धापकाळजन्य वा रोगजन्य मृत्यु टाळण्याकरता विधिपूर्वक आत्महत्या करणे वा वध करून घेणे श्रेयस्कर मानीत. यावरून स्पष्ट होते की संगम काळातील राजे त्यांच्या पुरोहिता राण्यांचे नियतकालिक पती होते (ज्याचे विवरण पुढील प्रकरणांमध्ये होईल).

या महाकाव्याचा शेवट 'मणिमेकलाई' या महाकाव्याचा कर्ता शात्तणार याच्या विनंतीवरून सेन्गुत्तुवान्ने मातृदेवता कण्णकीच्या पंथाची प्रतिष्ठापना करण्यात होतो. केरळच्या पर्वतकन्या, ज्यांच्यासमोर अजून मानवी असलेली कण्णकी येते, तिच्यासमोर खालील गाणे म्हणत नाचतात-








'या पुण्यशीला बालेची आपण स्तुतिस्तोत्रे गाऊ या,
जिच्या उपटून काढलेल्या स्तनाने मदुरा जळून खाक झाली
स्वर्गपृथ्वी तिच्या इच्छाशक्तीने कंपायमान होतात.

– खुद्द देव तिच्या पतीला शोधायला खाली आले.
गा ! नाच ! भाग्यवान सखे, गा !
गा ! नाच ! भाग्यवान सखे, गा !

आणि जेव्हा आम्ही मदुराई भस्मसात करणाऱ्या या बालेची स्तुतिस्तोत्रे गातो, तेव्हा आम्ही वर मागतो :

"आमच्या पर्वतांचा राजकुमार
आम्हाला धर्मपती म्हणून दे."
पुण्यवान् स्त्रियांनो, पूजा करायला या
मोहिनी कण्णकीची, जिची योनी आहे
नागफणीसारखी– जी एकवेळ उभी होती
हसत आमच्या सुपीक शेतांमध्ये' [८८]

ती सुपीकतेची देवी होती. आणि जरी ती चोल राज्याच्या पुहार या राजधानीत जन्मली व पांड्यांची राजधानी मदुराईत तिने तिचा पती गमावला, तरी तिने तिच्या 'महापरिनिर्वाणासाठी' व दैवीभवनासाठी मातृसत्तेची अभिजात भूमी असलेले चेर वा केरळ राज्य निवडले.

परंपरा केरळच्या प्राचीन इतिहासाला दोन कालखंडात विभाजित करते– (१) ब्रह्मन् शासनकाळ. व (२) पेरुमाल शासनकाळ. पेरुमालांनी केरळवर इ. स. २१६ ते इ. स. ८२५ पर्यंत राज्य केले, [८९] म्हणजे बाराव्या शतकाच्या कितीतरी आधी, ज्या कालमर्यादेआधी केरळावर पितृसत्तेचा अंमल होता असे सांगितले जाते. पद्मनाभ मेनन शिलालेखांच्या पुराव्याधारे– 'एकवेळच्या अखंड केरळचे चार राज्यात विभाजन शेवटच्या पेरुमालने केले,' या पौराणिक कथेची वासलात लावतात–

'मलबारवर राज्य करीत असलेली विविध घराणी अखेरच्या पेरुमालने या देशाच्या केलेल्या तथाकथित विभाजनापूर्वी अस्तित्वात होती व आपापल्या राज्यांवर त्यांचा ताबा होता याबद्दल निर्विवाद स्वरूपाचा जवळजवळ समकालीन पुरावा आहे.

... ... पेरुमालांच्या कालखंडात व त्यांच्यापैकी अखेरच्यांच्या काळात खालील घराण्यांचा मलबारच्या विविध विभागांवर स्वामी ( उथयवर ) म्हणून ताबा होता व त्यावर ती राज्य करीत होती :–

( १ ) त्रावणकोर वा वेणाटु
( २ ) झामोरिन वा एर्णाटु
( ३ ) कायंकुलम् वा ओटणाटु
( ४ ) आरंगोट्टु वा वेळ्ळुवनाडटु
( ५ ) नेडुम्परयर वा पालक्काटु

मलबारच्या चार प्रमुख घराण्यांपैकी आपल्याला येथे दोन नावे आढळतात; नावे नाहीत ती कोचीन व कोलट्टनाडची ... परंतु डॉ. डे यांच्या म्हणण्याप्रमाणे कोचीनच्या राजाला पेरुमालने इ. स. ३२५ च्या सुमारास बहाल केलेला किताब होता 'रविलोक शरजय' . . . दुसऱ्या बाजूला केरळ माहात्म्यम्च्या पुराव्यानुसार ''केरळवर प्रथम त्रावणकोर व कोलट्टिरी घराण्यांचा संयुक्त अम्मल होता; पण उत्तरेकडून झालेल्या परकीय आक्रमणामधून तो खिळखिळा झाल्यामुळे त्याचे पर्यवसान कोलट्टिरी शाखेचे स्वतंत्र राज्य होण्यात झाले . . .' [८६]

त्रावणकोरवर नेहमीच आट्टिंगलच्या राणीचा वडील मुलगा राज्य करीत आलेला आहे–

'. . . ( इंग्रजांच्या ईस्ट इंडिया कंपनीचा ) आइव्ह्ज् १७५७ मध्ये लिहिताना शेरा मारतो : ''. . . आट्टिंगाच्या राणीचा वडील मुलगाच नेहमी त्रावणकोरच्या राजमुकुटाचा उत्तराधिकारी असतो ...' [८७]

सर्वात अजब गोष्ट म्हणजे ही की त्रावणकोरवर राजाचे– या संज्ञेच्या रूढ अर्थी– राज्य कधीच नव्हते, कारण कोणताही शासक आट्टिंगलच्या राणीचा केवळ प्रतिनिधी असे–

'आंजेंगोला फेब्रुवारी १७२२ मध्ये उतरलेल्या फोर्बस्कडून आपल्याला समजते, ... "जेव्हा माझे आंजेंगोला वास्तव्य होते तेव्हा आट्टिंगांची अजूनही एक नामधारी राणी होती, जी मराठ्यांच्या सार्वभौम राजाप्रमाणे एक राजबंदी मात्र होती, तर तिच्या राज्याचा अपहार करणारा त्रावणकोरचा राजा पुण्याच्या पेशव्यांचे अनुकरण करीत आट्टिंगाच्या राणीचा दिवाण म्हणून किताब लावीत होता." यावरून हे उघड होते की हॅमिल्टनने निष्कर्ष काढल्याप्रमाणे राण्यांनी आपले सार्वभौम अधिकार राजा मार्तंड वर्माच्या संपूर्णतया हवाली केलेले नव्हते;

कारण राजा मार्तंड वर्माच्या मृत्यूनंतर तेरा वर्षांनी त्याचा उत्तराधिकारी राजा राम वर्मा हा आट्टिंगलच्या राणीचा दिवाण म्हणून किताब लावीत असलेला आपणाला आढळतो. त्रावणकोरच्या राजकुटुंबाच्या स्त्रीसदस्यांना हल्लीही आट्टिंगलच्या राण्या म्हणून ओळखले जाते, आणि ते गाव व आसमंतातील प्रदेश त्यांची खाजगी मालमत्ता मानली जाते. ती आट्टिंगल व एडकोडेची दोन अधिकरम् वा प्रोव्हर्थी वा महसुली सबडिव्हिजन आणि काही बागा मिळून बनलेली आहे. ती महसुली कारभाराच्या दृष्टीने सरकारी हस्तक्षेपापासून सर्वथा मुक्त आहे

' यात शंका नाही की या राण्यांच्या इंग्रजीत किताबती त्रावणकोरच्या ज्येष्ठ व कनिष्ठ राण्या अशा आहेत, परंतु राज्यभाषेतील सर्व सरकारी पत्रव्यवहारात व जाहीरनाम्यात त्यांच्या किताबती आट्टिंगल मूट्ट थंपुराट्टी व आट्टिंगल एळय थंपुराट्टी, म्हणजे आट्टिंगलच्या ज्येष्ठ व कनिष्ठ राण्या अशा आहेत "[८८]

मल्याळी राज्याच्या सत्ताधारी राजाला महाराजा व उत्तराधिकाऱ्याला एळय राजा असे म्हणत.[८९] हे उघड दिसते की या पदव्या मूट्ट थंपुराट्टी व एळय थंपुराट्टी यांची अनुकरणे आहेत. हे आपल्याला स्त्रीसत्ताक उत्तराधिकार कायद्याकडे घेऊन जाते की ज्याअन्वये, खासींप्रमाणे, गण व कुल यांच्या मातांच्या उत्तराधिकारी त्यांच्या ज्येष्ठ कन्या असत. पद्मनाभ मेनन यांचे म्हणणे अगोदरच उद्‌धृत केले आहे की– '........ मलबारच्या कायद्यात व रीतिरिवाजात असे काहीच नाही की ज्यातून स्त्रियांना सिंहासनाच्या उत्तराधिकारी होण्यापासून व देशाचे शासन करण्यापासून रोखले जाऊ शकते ...'[९०] म्हणून केरळात निदान त्रावणकोर तरी मुळात स्त्रीसत्ताक होते.

त्रावणकोरच्या राजांचा राज्याभिषेक तोपर्यंत पूर्ण मानला जात नव्हता जोपर्यंत ते खालील प्रथेची पूर्तता करीत नव्हते–

'आट्टिंगलच्या राजगृहाचा महिमा हल्ली एवढा मोठा आहे की त्रावणकोरच्या राजाला राज्याभिषेक झाल्यानंतर तदनुषंगिक विधींची पूर्तता करण्यासाठी या स्थानाला लगेच भेट द्यावी लागते आणि त्याच्या शासनकालात दर वर्षी मकरम् ( जानेवारी–फेब्रुवारी ) महिन्यातल्या अरि इट्टु वाळ्च या विधीसाठी या भेटीची पुनरावृत्ती करीत रहावे लागते.'[९१]

ही प्रथा दाखवते की त्रावणकोरच्या राजपदाचे आद्य स्थान आट्टिंगलचा प्रदेश होता. आट्टिंगल त्रावणकोर राज्याचा महसुली परगणा बनण्याआधी एक वेगळे राज्य असून त्याच्या शासक स्त्रिया होत्या–

अनुक्रमणिका

'... "१७०० च्या सुमारास राणी अशुरे वारली, व या ( आट्टिंगलच्या ) छोटेखानी राज्यात," कर्नल बिड्डुल्फ म्हणतो, "अंदाधुंदी माजली. ( येथे ) अशी परंपरा होती की केवळ स्त्रियांनीच राज्य करावे ...,''[९२]

आट्टिंगल हे पूर्वी कूपकांचे अभिजन होते व प्राचीन काळात आट्टिंगलच्या राणीला कूपकांची राणी म्हणत.[९३] केरलोत्पत्तीने नमूद केलेल्या परंपरेप्रमाणे मलनाड वा मलबार ( अर्थ डोंगराळ देश ) मुळात ज्या चार भागात विभाजित झालेला होता त्यापैकी कूप वा कूव वा कूवल हा एक होता. ते पुढील क्रमात दिलेले आहेत– ( १ ) तुलु, ( २ ) कूप, ( ३ ) केरळ, व ( ४ ) मूषक. तुलु म्हणजे कर्णाटक राज्याचे विद्यमान उत्तर व दक्षिण कारवार हे भाग; कूप म्हणजे हल्लीचा उत्तर मलबार; केरळ, दक्षिण मलबारशी जुळतामिळता आहे; मूषक म्हणजे आजचा दक्षिण त्रावणकोर.[९४] याचा अर्थ असा की चेर वा केरळच्या लोकांचा प्राचीन गण या चार ज्ञातींचा बनलेला होता. ब्रह्मन् शासनाचा– जे परशुरामाकडून वरदान म्हणून मल्याळींना दिले गेले असे सांगण्यात येते–वृत्तांत या अर्थाला पुष्टी देतो. या वृत्तांतानुसार चार सभा (कळकम् वा थलि) केरळच्या या चार भागांचे शासन करीत. ग्रामम् नावाच्या सोळा कुलसभांकडून प्रत्येक कळकम् निवडले जाई.[९५] या कळकम्‌ची अधिष्ठाने पुढीलप्रमाणे होती– ( १ ) पेरिन्चेल्लूर, ( २ ) पयन्नूर, ( ३ ) परप्पूर, व ( ४ ) चेंगण्यूर थिरुवंचिकुलम् या प्राचीन केरळच्या राजधानीत प्रत्येक कळकम्‌चे स्वतःचे कीर्तिमंदिर होते.[९६] ब्रह्मन् काळात दर तीन वर्षांनी[९७] व पेरुमाल काळात दर बारा वर्षांनी सबंध केरळीय गण राष्ट्रीय महत्वाच्या प्रश्नांबद्दल निर्णय घेण्याकरता व नवा रक्षापुरुषन् निवडण्याकरता पोन्नानी नदीच्या तीरावरील थिरुनावाये या ठिकाणी जमा होई.[९८] कुल, ज्ञाति व गणाच्या सभांना कूट्टम् * म्हणत.[९९]

कूपक हे अशा गणाची एक ज्ञाति होते. आता हे कूपक कोण होते ? जरी कूपक शब्द बहुधा विहीर ( हिंदी कुवा ) या अर्थी घेतला जातो, तरी अमरकोषानुसार ( ४८६ ) त्याचा अर्थ कोरड्या पडलेल्या नदीच्या पात्रात खणलेला खड्डा असाही होतो. विहीर व नदीची महाराष्ट्रातल्या नवप्रसूत स्त्रिया आसरा वा अप्सरा म्हणून पूजा करतात याचा अगोदर उल्लेख केलेलाच आहे. केरळात नागपूजेचे सर्वात जास्त चलन आहे व म्हणूनच नायरांच्या थरवाड

---

* खानदेशी शेतकरी भाऊबंदकीला अजून 'कूट' व 'गणगोत' म्हणतो.

गृहभूमीच्या नैर्ऋत्य कोपऱ्यात नागवाडी असे.[100] लोकपरंपरेनुसार दैवी सर्प विहिरी, तळी व नद्यात राहात. गंगेत आंघोळ करणाऱ्या अर्जुनाला पाहून मोहित झाल्याने नागकन्या उलूपी त्याला खाली खेचून नागलोकात घेऊन गेली असे महाभारत सांगते ( १ २१३ ). कोणतेही थरवाडगृह स्वतःच्या छोटया तळयावाचून नसे.[101] प्रत्येक खेडयाचे स्वतःचे मंदिरतळे असते व ज्याच्यावर ग्रामसमाजाचा बहिष्कार टाकला जाई त्याला या तळयात स्नान करायची मनाई असे.[102]

शेतीचा उदय नदीखोऱ्याखालोखाल कोरडया केलेल्या तलावांच्या तळांमध्ये व सोयीस्कर तलावांच्या सभोवतालच्या जमिनीमध्ये झाला. शाक्य गणाच्या पूर्वजांनी एका तलावाच्या सभोवतालची जमीन लागवडीला आणली[103] जयद्दिस जातक ( ५१३ ) आपल्याला सांगते की उत्तर पंचालांच्या जयद्दिस राजाने एका तलावासभोवतालच्या लागवडीलायक जमिनीवर १००० कुळांना वसवले व ते नगर चुल्लकम्मासदम्म या नावाने प्रसिद्धीला आले.[104] प्रस्तुत लेखकाला धुळे जिल्ह्याच्या अशा काही तलावांची प्रत्यक्ष माहिती आहे की ज्यात अगदी आतापर्यंत शेती केली जात होती. याला केरळात कोल लागवड म्हणतात–

'कोल लागवड– लागवडीचा हा प्रकार कोचीन, त्रावणकोर व मलबारमध्ये प्रचलित आहे. त्याचा अर्थ होतो गोडया पाण्याच्या तलावांचे पाणी काढून टाकून त्यात भाताची लागवड करणे. सबंध त्रिचूर तलावात अशी लागवड केली जाते. तळांची निरनिराळया क्षेत्राच्या तुकडयांमध्ये विभागणी करून तात्पुरते बांध टाकले जातात व पेरणीपूर्वी पाणी उपसून टाकले जाते. चांगला कोल हंगाम इतर शेतीतल्या वाईट हंगामाच्या दुष्परिणामांपासून राज्याचा बचाव करतो . . .'[105]

या जमिनीचीही राष्ट्र जमिनीप्रमाणेच विभागणी होत असली पाहिजे. अगोदर विवरण केल्याप्रमाणे चौपटाचा खेळ केरळला अपरिचित नव्हता. मध्ययुगीन काळात भाताचे आगर असलेल्या कुट्टनाडच्या देवस्वम् जमिनीचे व्यवस्थापन नंबूद्रीब्राह्मणांच्या एका ज्ञातीकडे होते व ते आपला रिकामा वेळ चौपट खेळण्यात घालवीत.[106] संगम काळातला एक अत्यंत आवडता खेळ चौपट हा होता. कनकसभाइ सांगतात–

' ... स्त्रिया घरी आपली करमणूक पोपटांना व्हल्लइ व अम्मनइ गायला शिकवून, झोके घेऊन, आणि थयम्, फलंकु व पंथु हे खेळ खेळून करीत. थयम् म्हणजे हल्लीच्या फाशांचा खेळ होता; परंतु फासे आतासारखे चौकोनी

अनुक्रमणिका

लंबठोकळे नव्हते, तर काळे ठिपके असलेले खेकड्याच्या पाठीसारखे वर्तुळाकार होते ...'[१०७]

भाताची शेती हा प्राचीन व मध्ययुगीन* केरळचा सर्वात सन्माननीय धंदा होता व ती करायचे रूढ तंत्र सिंधुसंस्कृतीच्या शेतीहून वेगळे नव्हते–

'... त्याच्या ( ग्रोजच्या ) काळात मलबारमध्ये भाताची शेती हा एक सन्माननीय धंदा मानला जात होता व तो करणारे कसबी कारागिरांपेक्षा श्रेष्ठ समजले जात होते. तो म्हणतो, " तो जून महिन्यात पेरला जातो, व त्याची जमीन म्हणजे शिगोशीग भरून वाहणाऱ्या नद्यांचे पाणी काठांवर पसरल्यामुळे बनलेली डबकी असतात रोप जेव्हा वीतभर उंच होते तेव्हा ते उपटले जाते व अगदी अशाच जमिनीत त्याची लावणी होते. त्यांचा हंगाम हिवाळ्याच्या आरंभी आवरला जातो .[१०८]

त्यांची अवजारे सिंधु संस्कृतीचे शेतकरी वापरीत तशीच असत–'... त्यांचा नांगर अगदी साधे यंत्र असते व एखादी फाट्याची फांदी वखराचे काम देते..". '[१०९]

म्हणून नदीकाठच्या या जमिनींच्या विभाजनाची पद्धत कोरड्या केलेल्या तलावांच्या तळजमिनीहून वेगळी नसावी. अशा प्रकारे कूपक हे अशा कूप वा कोल जमिनी खेडणारे लोक होते व ते सिंधु संस्कृतीतील जमीनवाटपाप्रमाणे आपल्या राष्ट्र जमिनींचे दर वर्षी वाटप करीत. कूपक हे स्त्रीसत्ताक असल्यामुळे ते केरळीय गणांची एक स्त्रीशासित ज्ञाति होते.

करिनापिळ्ळी, कार्टिकपिळ्ळी, कायंकुलम् व पाणपिळ्ळी या राज्यांचे मूळ शासक आट्टिंगलच्या राणीच्या चार मुली होत्या.[११०] हेच ते कार्टिकपिळ्ळी की ज्यात 'पुरुषांना कोणत्याही स्त्रीला शीलभ्रष्ट करायचा अधिकार होता' एलयड स्वरूपम्चे शासन आट्टिंगलच्या एका शाखेकडे होते.[१११] क्विलॉनचेही तसेच होते.[११२] क्विलॉनचे मूळ नाव जयसिंहनवरून जयसिंहनाड असे होते. तो वेणाट वा त्रावणकोरचा एक नाड ( जिल्हा ) होता.[११३] म्हणून क्विलॉन वा जयसिंहनाड हा मुळात आट्टिंगलचा वा कूपकांचा एक नाड असला पाहिजे. या जयसिंहन्ने कूपकांच्या राणीशी लग्न केले व त्यांना झालेल्या रविवर्मा कुलशेखर पेरुमाल नावाच्या मुलाने सबंध केरळवर राज्य केले.[११४] पद्मनाभ मेनन यांच्या मते त्रावणकोरच्या ( आट्टिंगलच्या ) एका शाखेचे ज्येष्ठतम वा सर्वात कर्तबगार पुरुष कुलशेखर पेरुमाल म्हणून राज्य करीत असले पाहिजेत.[११५]

* सामंत प्रथेतली म्हण होती – 'उत्तम शेती, मध्यम व्यापार, कनिष्ठ नोकरी.'

अनुक्रमणिका

केरळ माहात्म्यम् अशी एक प्राचीन परंपरा नमूद करते की, केरळवर प्रथम त्रावणकोर व कोलट्टिरी घराण्यांचा संयुक्त अमल होता.' [११६] प्राचीन केरळची राजधानी थिरुवंचिक्कुलम् होती व तिचे अवशेष उत्तर त्रावणकोर-मधल्या थिरुवक्कारूर या ओसाड गावात सापडले आहेत. [११७] इ. स. २१६ ते ८२५ पर्यंत केरळवर राज्य करणाऱ्या पेरुमालांचीही ती राजधानी होती. थिरुवंचिक्कुलम्च्या महामंदिरात अत्यंत पुरातन काळाच्या या दोन मूर्ती आहेत आणि त्या पेरुमाल व त्याची पत्नी चेरोट्टी अम्मा यांच्या आहेत असे मानले जाते. [११८] चेरचा अर्थ होतो भूमी. [११९] म्हणून चेरोट्टी अम्माचा अर्थ होतो भूमाता. केवळ कूपकांची राणीच चेरोट्टी अम्माची मानवी प्रतिनिधी होऊ शकत होती. ब्रह्मन् कालखंडात ती रक्षापुरुषन्च्या स्वरूपात त्रैवार्षिक पती करीत असे व पेरुमाल कालखंडात द्वादशवार्षिक. आट्टिंगलच्या राज्यारूढ राणीला मूट्ट थंपु-राट्टी असे म्हणत. [१२०] राट्टी हा राट् वा राष्ट्रीचा पर्यायवाची शब्द आहे हे उघड आहे म्हणून कूपकांची राणी ही प्राचीन स्त्रीसत्ताक केरळची राष्ट्री होती.

केरळात भूमातेला भगवती असे म्हणतात. मातृदेवता दुर्गेचे एक नाव भगवती असे आहे. १.१६४ हे ऋग्वेदीय सूक्त तत्त्वज्ञानात्मक असल्याचे सांगितले जाते. त्याची ३२ वी ऋचा निर्ऋतीचे स्तवन करते व निरुक्त ( २.८ ) सांगतो की निर्ऋतीचा येथे अर्थ भूमाता असा होतो. याच सूक्ताच्या ४० व्या ऋचेत गाईला भगवती असे संबोधले आहे. भगचा अर्थ होतो योनी वा भाग. जी गणधनाचे वाटप करी तिलाच मुळात भगवती असे म्हणत असले पाहिजे. निघण्टुअन्वये ( १.१.१ ) पृथिवीचे एक नाव गौः, गाय, हे आहे. महाभारत २.७७.१९; ८.८३.२०, ४३-४४ ) आपल्याला सांगते की पांडव वनवासात जायला निघाले तेव्हा दुःशासनाने त्यांच्यापुढे नाचत खिजवण्या-करता— "गौः गौः," अशा आरोळ्या मारल्या. हे संबोधन द्रौपदीला उद्देशून होते का? युधिष्ठिर खालील श्लोकातून महाभारताच्या महासंघर्षाचे सार सांगतो, ( ३.८६.१०-१३ )—

"योऽस्त्र- वेग- अनिल-बलः शर-अर्चिस् तल-निःस्वनः ।
रजो-धूमोऽस्त्र-सम्पातो धार्तराष्ट्र-अनिल-उद्धूतः ॥
निसृष्ट इव कालेन युगान्ते ज्वलनो महान् ।
मम सैन्यमयं तृणकक्षं प्रधक्ष्यति न संशयः ॥

[ "( हा कर्ण ) यमाने पाठवलेला साक्षात् प्रलयाग्नीच आहे. अस्त्रवेग हे त्याचे इंधन बळ आहे. बाण ज्वाला आहेत, तळहातांचा आवाज गर्जना, युद्धधुमाळीचा धुरळा धूर, व अस्त्रे गती आहे. धृतराष्ट्रपुत्रांच्या वाऱ्याने प्रदीप्त केलेला हा अग्नी माझे सैन्यतृण भस्मसात् करील यात शंका नाही. ]

अनुक्रमणिका

" तं स कृष्णा– अनिल– उद्धृतो दिव्यास्त्र– ज्वलनो महान् ।
श्वेत–वाजि–बलाका–भृद् गाण्डीव–इंद्रायुध–उल्बणः ॥
संरब्धः शरधाराभिः सुदीप्तं कर्ण–पावकम् ।
अर्जुन–उदीरितो मेघः शमयिष्यति संयुगे ॥

(" पण द्रौपदीचा झंझावात ज्याची प्रेरणा, दिव्य अस्त्रे ज्याची विद्युल्लता, पांढरे घोडे ज्याचे बगळे, भीषण गांडीव धनुष्य ज्याचे इंद्रधनुष्य, असा हा खवळलेला साक्षात् मेघ असलेला अर्जून शरधारांनी प्रदीप्त कर्णाग्नीला युद्धात विझवून टाकील. " ]

हा लढा पितृसत्ताक कुरु गण व स्त्रीसत्ताक पांडव गण यांच्यात झाला असावा असे दिसते. द्रौपदीचे वास्तविक व्यक्तिमत्त्व हा तर्क सिद्ध करते. द्रौपदी ही पांडवांची केवळ ' साधारणी ' पत्नीच नव्हती, तर त्या गणांची देवीही होती. ( २.७०.१;२.७१.७ ) तिने कृष्णाची आवडती पत्नी सत्यभामा इला सांगितले की पांडव बलसंवर्धन व शस्त्रास्त्रविद्येची उपासना यात मग्न राहात असत व इंद्रप्रस्थाच्या राज्याचा आर्थिक व शासकीय कारभार तिला पाहावा लागत असे ( ३,२३३.५०–६६ )–

" शतम् अश्वसहस्राणि दश–नाग–अयुतानि च ।
युधिष्ठिरस्य अनुयात्रम् इन्द्रप्रस्थ–निवासिनः ॥
एतद् आसीत् तदा राज्ञो यन् महीं पर्यपालयत् ।
येषां संख्या–विधि च एव प्रदिशामि शृणोमि च ॥

[ " इंद्रप्रस्थात निवास करणाऱ्या युधिष्ठिराच्या ( पागेत ) एक लक्ष घोडे होते व ( हत्तीखान्यात ) एक लक्ष हत्ती होते. तो राजा पृथ्वीचे पालन करीत होता तेव्हा त्याच्यापाशी हे ( सर्व ) होते. या ( मोतद्दारांना व माहुतांना ) मी त्यांची कामे नेमून देत असे व त्यांनी केलेल्या कामांची मोजदाद करीत असे. ]

" अन्तःपुराणां सर्वेषां भृत्यानां च एव सर्वशः ।
आ-गोपाल–अवि–पालेभ्यः सर्वं वेद कृत-अकृतम् ॥

[ " त्याचप्रमाणे अन्तःपुरातील सर्व स्त्रियांनी व सेवकांनी, आणि गायक्यांपासून तर मेंढक्यांपर्यंत सर्वांनी केलेल्या व न केलेल्या सर्व कामांची मला खडान् खडा माहिती असे. ]

" सर्वं राज्ञः समुदयम् आयं च व्ययम् एव च ।
एक अहं वेद्मि कल्याणी पाण्डवानां यशस्विनि ॥







[ " यशस्विनी कल्याणी ( सत्यभामे ), राजा ( युधिष्ठिराचा ) सर्व महसूल आणि पांडवाची मिळकत व खर्च यांची माहिती मला एकटीलाच होती.]

" मयि सर्वं समासज्य कुटुम्बं भरत-र्षभाः ।
उपासन-रताः सर्वे घटयन्ति वर-आनने ॥ "

[ " सुमुखी, कुलाचा सर्व कारभार माझ्यावर सोपवून ते भरतांचे सांड ( शस्त्रास्त्रविद्येची ) उपासना करण्यात मग्न राहात. " ]

अशा प्रकारे द्रौपदी ही पांडवगणाची राष्ट्री होती. पांडव या शब्दाचा अर्थ पांडूचे पुत्र असता या पितृवंशीयतेशी मातृवंशीयतेचा कसा ताळमेळ बसू शकतो ? चित्ररथाने अर्जुनाला ज्या तापत्य, तपतीचा वंशज, या नावाने हाक मारली, त्याचा उल्लेख अगोदर केलेलाच आहे. पांडवांची कुलदेवता दुर्गा होती; कारण मत्स्यांच्या विराट नगरीत अज्ञातवासाचे वर्ष व्यतीत करण्यासाठी शिरण्याआधी युधिष्ठिराने मदतीसाठी तिचा धावा केला. ( ४.६ ). या प्रार्थनेत युधिष्ठिर तिला कृष्णाची भगिनी ( वासुदेवस्य भगिनीं ... .. । ४.६.४ ) म्हणून संबोधतो. पांडवांची आई कुंती ही कृष्णाची आत्या होती. द्रौपदीचे कृष्णा हे नावच सूचित करते की ती काली दुर्गेची मानवी प्रतिनिधी होती व त्या भूमिकेत ती कृष्णाची भगिनी होती.

दुर्गेचे आवाहन युधिष्ठिराने 'महिष-असुर-मर्दिनी' व 'विन्ध्य-वासिनी' या नावांनी करतो ( ४.६.१५, १७ ). ही संबोधने दाखवतात की तिची जन्मभूमी दक्षिण भारत असली पाहिजे. तामिळ महाकाव्य शिळप्पदिकारम्‌वरून तिच्या सांप्रदायाचे कनकसभाइ यांनी दिलेले वर्णन वरील तर्काला पुष्टी देते--

'विल्लुवर व मिनवर या आदिवासींना देव नव्हते असे दिसते. तामिळ देशात राहाणाऱ्या या आदिवासींना प्रथम जिंकणारे नाग हे भयंकरी देवी कालीची पूजा करीत व तिच्या देवळांमध्ये अनेक हेल्यांना ( महिषांना ) बळी देत. कालीची मूर्ती अत्यंत भीतिदायक पद्धतीने सजवलेली असे. तिचे जटिल केस डोक्यावर तरुण नागाच्या चमकदार कातीने मुकुटाप्रमाणे बांधलेले असत. रानडुकराचा वाकडा सुळा चंद्राच्या कोरीसारखा दिसेल अशा पद्धतीने केसांमध्ये अडकवलेला असे. गळ्यात वाघाच्या दातांची माळ असे. वाघाचे पट्टेदार कातडे एखाद्या वस्त्रासारखे तिच्या कंबरेभोवती गुंडाळलेले असे. प्रत्यंचा लावलेले व शरसंधानाला सज्ज असलेले धनुष्य तिच्या हातात असे. फाटेरी शिंगांच्या एका उंच काळवीटावर ती आरूढ झालेली असे. तिच्या मूर्तीपुढील ढोलपिंगाण्यांच्या गजरात उग्र नाग तिच्या वेदीवर हेल्यांचा बळी देत. बळींचे

रक्त वाहात असतानाच काऊ अंगात आल्याने उन्मत्त होऊन उठलेली पुजारीण कापत व बेभानपणे नाचत ओरडे, "आमच्या आजूबाजूच्या खेड्यांमधले गोठे गाईबैलांनी भरलेले आहेत, पण एयिनारांच्या झोपड्यांचे वाडगे सुने आहेत. ज्यांनी चोरी व लुटीवर जगावे ते एयिनार शांतिप्रिय खेडुतांसारखे नेभळे बनले आहेत. काळवीटावर बसणाऱ्या देवीला जर तुम्ही ठरलेला बळी दिला नाही तर ती तुमच्या धनुष्यांना यश देणार नाही!" काली स्त्रीदैवत असल्यामुळे तिच्या उपासिका तिला घंटया, बाहुल्या, पोपट, रानकोंबडया व तामिळ स्त्रियांचे करमणुकीचे साधन असलेले मोर अर्पण करीत. ऊद, गंध व कुंकू, चंदन आगरू, उकडलेले वालवाटाणे व धान्ये, आणि रक्त व मांसमिश्रित भाताचे नैवेद्य तिच्या देवळांमध्ये ठेवले जात . कालीला तामिळमध्ये ऐयई असेही म्हणत, व सात बहिणीतली† सगळयात लहान असल्याचे मानले जाई... या क्रूर देवीला लोक एवढे भीत असत की एकदा जेव्हा मदुरेतल्या तिच्या मंदिराची बंद झालेली दारे उघडेनात, तेव्हा ते तिच्या कोपाचे लक्षण मानून पांड्य राजा तिच्या मंदिरासमोर दया भाकत साष्टांग पडला, आणि तिचा क्रोध शांत करण्याकरता तिच्या पूजेच्या खर्चासाठी त्याने दोन सुपीक खेड्यांचा महसूल दान म्हणून दिला.'[१२१]

कौरवांची कडवी पितृसत्ताकता व पांडवांची स्त्रीसत्ताकतेबद्दलची चिवट सनातनप्रियता यांची घडण एकमेकांशी सख्ख्या चुलतभावाचे नाते असलेल्यांचा एका पिढीत होणे शक्य नव्हते. हेच जास्त संभवनीय आहे की पांडव हे मध्य वा दक्षिण भारताचा एक स्त्रीसत्ताक वा मातृवंशक गण होते व ज्याच्याशी त्याचे कसलेही नाते नव्हते अशा पितृसत्ताक कौरव गणाशी त्यांचा वारंवार संघर्ष आला. चित्ररथ गंधर्व अर्जुनाला ज्या तापत्य या नावाने संबोधतो त्याचा अर्थ तापी नदीदेवतेचा वंशज असाही होतो. दक्षिण भारतीय नद्यांवर बऱ्याच प्राचीन काळापासून नदीवक्त्र कृषी रूढ झालेली होती. कारण पुरातन परंपरा सांगते की काठावरून उतू जाऊन दोन्ही बाजूंचा प्रदेश जलमग्न करणाऱ्या कावेरी नदीच्या दोन्ही तीरांना करिकाल राजाने (इ. स. १००) बांध बांधले—

'महावंसोची रचना इ स. च्या पाचव्या शतकात झाली व दीपवंसोची आणखी अगोदर; आणि या दोन्ही कृती गजबाहू १ चा उल्लेख करतात. असे दिसते की त्याचा पिता "वाकडनाक्या" तिस्स याच्या अमदानीत एक चोल राजा सीलोनवर स्वारी करून कित्येक हजार लोकांना युद्धकैदी* म्हणून पकडून

† हे सप्तमातृकांना उद्देशून आहे हे उघड आहे.

* हे युद्धजित दासच असू शकत होते. पहा प्रकरण ११.

घेऊन गेला होता. त्याचा बदला म्हणून गजबाहूने इ. स. ११३ मध्ये सिंहासनाधिष्ठित झाल्यानंतर लगेच चोल राज्यावर स्वारी केली. परंपरा सांगते की युद्धकैद्यांचे हे अपवहन त्यावेळी कावेरी नदीला बांधल्या जात असलेल्या बांधावर काम करण्यासाठी केले गेले होते. नंतरची तामिळ काव्ये व शिलालेख सांगतात की करिकाल चोलने कावेरी नदीच्या दोन्ही तीरांवर उंच बांध बांधायला प्रारंभ केला. कावेरीचे हे बांध तिच्या मुखापासून १०० मैल वर गेलेले असल्यामुळे एवढ्या ( प्रचंड ) प्रमाणावरील हे काम करिकालच्या शासनकाळात पुरे होणे शक्य नव्हते ... '[१२३]

या सर्व घटनांचा समन्वय घालता असा निष्कर्ष काढला जाऊ शकतो, की पांडव गण हा महान् स्त्रीसत्ताक नदीवक्त्र कृषिसंस्कृतीचा एक अवशेष असला पाहिजे.

महाभारताने सांगितलेल्या सावित्रीच्या सुप्रसिद्ध कथेचे (३.२९३-२९९) पुन्हा व जास्त काळजी पूर्वक परीक्षण होणे जरूर आहे. सावित्री ही मद्रांच्या अश्वपति नावाच्या राजाला त्याच्या मालवी ( मालव वा मल्लु गणाची कन्या ) राणीपासून झालेली एकुलती एक मुलगी होती. ती मातृदेवता सूर्या सावित्रीने राजाला दिलेल्या वरदानातून झालेली असल्याने तिचे सावित्री असे नामकरण झाले होते. वयात आल्यानंतर तिने शाल्वांचा अंध व म्हणून बहिष्कृत राजा द्युमत्सेन व त्याची पत्नी शैब्या ( शिबिगणाची कन्या ) याचा एकुलता एक पुत्र सत्यवान याला वरले. सत्यवान् विवाहापासून बरोबर एक वर्षाने मरणार असे 'विधिलिखित' होते. सावित्रीने आपल्या शहाणपणाने व चातुर्याने मृतांचा राजा यमाला प्रसन्न करून पाच वर मिळवले, ज्यातल्या शेवटच्याने मृत सत्यवान् पुनरुज्जीवित होऊन दीर्घायुषी झाला. तिला तिसरा व चौथा वर देताना यम म्हणाला ( ३.२९७.५८-६० )—

"त्वयि पुत्र-शतं च एव सत्यवान् जनयिष्यति।
ते च अपि सर्वे राजानः क्षत्रियाः पुत्र-पौत्रिणः ॥
ख्यातास् त्वन् नामधेयाश् च भविष्यति इह शाश्वताः।

[ "सत्यवानाला तुझ्यापासून शंभर पुत्र होतील. ते पुत्रपौत्रांचे ( धनी असलेले ) क्षत्रिय राजे होतील, व ते अनंत काळपर्यंत तुझ्या नावाने प्रख्यात होतील. ]

"पितुश् च ते पुत्र-शतं भविता तव मातरि ॥
मालव्यां मालवा नाम शाश्वताः पुत्रपौत्रिणः।
भ्रातरस् ते भविष्यन्ति क्षत्रियास् त्रिदश-उपमाः ॥"

अनुक्रमणिका

[ " तुझ्या पित्याला तुझ्या मालवी मातेपासून शंभर पुत्र होतील. पुत्र-पौत्रांनी ( संपन्न ) असलेले ते तुझे भाऊ देवोपम क्षत्रिय राजे होतील, व ते सदैव मालव या नावाने ओळखले जातील. " ]

यावरून हे निर्विवादपणे स्पष्ट होते की मद्र, शाल्व, मालव वा मल्ल, शिबि व सावित्रीपुत्र हे गण महाभारताच्या आठवणीत स्त्रीसत्ताक होते. महाभारताच्या उपलब्ध आवृत्तीचे भृगुगोत्रीयांनी पितृसत्ताकतेला अनुकूल असे संस्करण केलेले असल्यामुळे स्त्रीप्रधान विवाहाचे ' जबरीने ' पुरुषप्रधान विवाहात रूपांतर करण्यात आलेले आहे. पुरुषप्रधान विवाहात माद्र अश्वपतीची संतती त्याच्या मालवी राणीच्या नावाने कधीही ओळखली गेली नसती, वा सत्यवानाचे संतान सावित्री-पुत्र म्हणून ख्याती पावले असते. या गणांच्या मातृवंशकतेतून तर्कशुद्ध निष्कर्ष हा निघतो की, माद्र अश्वपति हा राष्ट्री मालवीकडे " नांदायला " गेला असावा, तर सावित्रीने तिच्या मातृगृही नांदायला आणलेल्या सत्यवानाशी शरीरसंबंध करून नव्या स्त्रीसत्ताक गणाचे देवीपद संपादन केले असावे.

येथून आपण परत राष्ट्री वाक्‌कडे, त्या पदाला अभिप्रेत असलेले कार्य करणारी ती पहिली स्त्री नसली तरी त्या पदाने प्रथम प्रख्यात झालेल्या स्त्रीकडे, वळू या. अथर्ववेदात ( ४.३० ) व ऋग्वेदात ( १०.१२५ ) तिचे स्तवन करणारे एक अत्यंत वैशिष्टचपूर्ण सूक्त आहे अथर्ववेदीय सूक्ताचे शीर्षक मोठे सूचक आहे- ' राष्ट्री-देवी. ' त्याच्या सर्वात महत्वाच्या ऋचा मुक्त अनुवादासह खाली दिल्या आहेत-

" अहं रुद्रेभिर् वसुभिश् चराम्य् अहम् आदित्यैर् उत विश्वदेवैः ।
अहं मित्रा-वरुणा उभा बिभर्म्य् अहम् इन्द्र-अग्नी अहम् अश्विना उभा ॥१॥

[ " मी रुद्रांबरोबर व वसूंबरोबर संचार करते, मी आदित्यांबरोबर व विश्वेदेवांबरोबर मी उभयता मित्र व वरुण यांना धारण करते, मी इंद्र व अग्नीला, तसेच जुळ्या अश्विनीकुमारांना. ]

" अहं राष्ट्री सङ्गमनी वसूनां चिकितुषी प्रथमा यज्ञियानाम् ।
तां मा देवा व्यदधुः पुरुत्रा भूरिस्थात्रां भूर्य् आवेशयन्तः ॥ २ ॥

[ " मी राष्ट्री आहे, गणधनांचे निधान मी ज्ञातृ † आहे, यज्ञवेत्त्यांमध्ये आद्य. मला ( राष्ट्र म्हणून ) देवांनी आपसात वाटून घेतले आहे. माझी अनेक अधिष्ठाने असून अनेकात मी समाविष्ट झाले आहे. ]

---

† ' ज्ञातृ'चा अर्थ ज्ञातिमाता असाही होतो.

" अहम् एव स्वयम् इदं वदामि जुष्टं देवानाम् उत मानुषाणाम् ।
यं कामये तं तम् उग्रं कृणोमि तं ब्रह्माणं तम् ऋषिं तं सुमेधाम् ॥ ३ ॥

[ " मी स्वतः त्याची घोषणा करते जे देव व मनुष्य ( दोघांनाही ) प्रिय आहे. ज्याच्यावर मी प्रेम करते त्याला मी शक्तिशाली बनवते, त्याला ब्रह्मन् त्याला कवी, त्याला महाप्रज्ञ. ]

" मया सोऽन्नम् अत्ति यो विपश्यति यः प्राणति य ईं शृणोत्य् उक्तम् ।
अमन्तवो मां त उपक्षियन्ति श्रुधि श्रुत श्रद्धेयं ते वदामि ॥ ४ ॥

[ " माझ्याच कृपेने विवेकी माणूस अन्न खातो, जो श्वासोच्छ्वास करतो, जो बोललेले ऐकतो. मला न जाणणारे नाश पावतात. बहुश्रुता, माझी मंगल वाणी श्रद्धापूर्वक ऐक ! ]

" अहं रुद्राय धनुर्–आतनोमि ब्रह्म–द्विषे हन्तवा उ ।
अहं जनाय समदं कृणोम्य् अहं द्यावा–पृथिवी आ विवेश ॥ ५ ॥

[ " मी रुद्रांकरता त्यांचे धनुष्य खेचते, या करता की बाणाने मंत्र-द्वेष्टयाचा संहार व्हावा. मी ज्ञातीसाठी गणभोजने § संघटित करते, पृथ्वी व आकाशाला मी व्यापले आहे. ]

" अहं सोमम् आहनसं बिभर्म्य् अहं त्वष्टारम् उत पूषणं भगम् ।
अहं दधामि द्रविणं हविष्मते सुप्राव्ये यजमानाय सुन्वते ॥ ६ ॥ "

[ " मी नियतमरणी सोमाला धारण करते, मी त्वष्टयाला, तसेच पूषाला व भगाला. मी हवि अर्पण करणाऱ्याला धन देते, सोम पिळणाऱ्यालाही, तसेच यजमानाला व चांगल्या होतृ ( ऋत्विजाला ). " ]

वाक् ही अम्भृणची कन्या असल्याचे निरुक्त ( ७-२ ) सांगते. राष्ट्रीतून मातृदेवतेत परिवर्तित झालेल्या वाक्‌ला पितृनाम लावणे हास्यास्पद आहे. बृहदारण्यक उपनिषद्‌ने दिलेल्या वाजसनेयि वंशीय आचार्यांच्या यादीची शिखरस्थ नावे पुढीलप्रमाणे –

---

§ 'समदम्' चा अर्थ बहुधा कलह वा युद्ध असा केला जातो. परंतु निरुक्ताने ( ९.१७ ) दिलेला दुसरा अर्थ जास्त समर्पक आहे – 'समदः सम् + अदो वा अत्तेः। ...'[१२४] अथर्ववेदीय ऋचा ३.३०.६ सहभोजनाचे आवाहन करते ( सह वो अन्न–भागः। ). विनयपिटक 'गण–भोजना'चा निर्देश करते,[१२५] तसेच 'जाति–भोजा' चाही.[१२६]







'कश्यप नैध्रुविने वाक्पासून,
वाक्ने अग्निणीपासून,
अग्निर्णाने आदित्यापासून.' [१२७]

अर्थशास्त्रात (१.१२) आपल्याला अम्भीय या नावाचा एक अर्थशास्त्र-सांप्रदाय आढळतो. कोसंबी विवरण करतात.

'... या नव्या राज्यशास्त्राचे (ख्रिस्तपूर्व सहाव्या शतकाचे) आचार्य त्यांच्या क्षेत्रात तेवढेच महनीय व कर्तृत्ववान् होते जेवढे समकालीन धार्मिक नेते. त्यांची नावे एका पुस्तकात. या (आचार्य) परंपरेतल्या श्रेष्ठतम व अंतिम (आचार्यांच्या) सारसंग्रहात, कौटल्याच्या अर्थशास्त्रात, अवशिष्ट आहेत ... ही नामावली मोठी प्रभावशाली आहे : भरद्वाज, कात्यायन, पराशर, उशनस्, व बृहस्पति हे चांगली ब्राह्मण नावे धारण करतात. त्या काळच्या जास्त प्राचीन धर्मसांप्रदायांप्रमाणे या नावांमधली काही नावे संपूर्ण सांप्रदायांची निदर्शक आहेत. बाहुदन्ती-पुत्र, किञ्जल्क, कौणपदन्त, पिशुन, विशालाक्ष, वातव्याधि, व दीर्घ चारायण हे अर्थातच क्षत्रिय होते. क्षत्रिय (आचार्य) परंपरेतील महत्त्वपूर्ण प्रमुख सांप्रदायाचे नाव होते आम्भीय ...' [१२८]

या एकाकी नावाबद्दल ख्रिस्तपूर्व चौथे शतक जास्त माहिती पुरवते—

'सिंधूच्या पश्चिमेकडील प्रदेश पहिल्या दारियसने ख्रिस्तपूर्व ५१८ च्या सुमारास जिंकल्यापासून इराणी साम्राज्याचा विसावा सत्रपी सुभा होता अकेमेनिड सुभ्यांमधला तो सर्वात लाभलायक सुभा होता असे दिसते. हेरोडोटसच्या म्हणण्याप्रमाणे त्याची वार्षिक खंडणी सोन्याच्या मातीत ३०० टॅलेंट, सुमारे ९ टन होती— सिंधूच्या वरच्या पात्रातल्या वाळूतून धुऊन व तिबेट वा काश्मीरच्या खाणींमधून खणून काढलेला हा अद्भुत खजिना होता. या सत्रपीची व त्यालगतच्या प्रदेशांची लोकर व भारी लोकरी कापड भारतभर प्रसिद्ध होते. या प्रांताचे मुख्य व्यापारी केंद्र पुष्करावती, आधुनिक चारसद्दा, ग्रीकांचे प्यूकेलाओतीस, हे शहर होते. या नावाचा अर्थ होतो 'कृत्रिम पुष्करिणि असलेले,' सिंधु संस्कृतीत ज्याचा आपण मागोवा घेतला ते पुष्कर. या शहराचे भारत-ग्रीक काळाचे व बनावटीचे एकमेव उपलब्ध नाणे त्याच्या एका बाजूवर वर्णिड असलेला भव्य भारतीय बैल व दुसऱ्या बाजूवर हातात कमल घेतलेली पुष्करावतीची मातृदेवता अंबी दाखवून प्राचीन काळची स्मृती जतन करते ...' [१२९].

अंबीचा अर्थ होतो माता. सिंधूच्या पूर्वेस अंभींचे राज्य वसलेले होते—





'... सिंधूच्या पूर्वेला, पण त्याच गणप्रधान गंधार जनपदाच्या एका भागात, तक्षशीला हे महान् सांस्कृतिक व व्यापारी केंद्र वसलेले होते .... '

'... तीस दिवसांच्या वेढ्यानंतर ( शिकंदरकडून ) चारसद्दाचा पाडाव झाला; .. सिंधू बिनविरोध पार केल्यानंतरच्या मोहिमांचे निकाल उत्तेजनकारक होते. तक्षशीलेचा राजा आंभि लढाई न करताच शरण आला व खंडणी देताना म्हणाला की, दोघाना पुरेल एवढे आहे, मग झगडा कशाला ...'[८०]

पाणिनीच्या तद्राज प्रत्ययांबाबतच्या सूत्रांवरून ( ४.१.१६८-१७३ ) आपण असे म्हणू शकतो की अंभी हे जनपदाचे व त्यात राहाणाऱ्या क्षत्रिय गणाचे नाव असून त्या गणाच्या संतानाना व राजाला आंभि असे म्हणत. ५.४६.८ या ऋचेने दिलेली देवपत्न्यांची काही नावे या दृष्टीने उद्बोधक आहेत– इंद्राणी, इंद्राची पत्नी, व वरुणानी, वरुणाची पत्नी. अमरकोषाने दिलेली ( ७३-७४ ) मातृदेवता पार्वतीची काही नावे पुढीलप्रमाणे– भवानी ( पुंल्लिंगी–भव ), रुद्राणी ( पुंल्लिंगी–रुद्र ), शर्वाणी ( पुंल्लिंगी–शर्व ), व मृदानी. ४.३७.३ या अथर्ववेदीय ऋचेत प्रमन्दनी वा प्रमन्दिनी नावाच्या अप्सरेचा उल्लेख आलेला आहे. ३.५३.१४ या ऋचेवर भाष्य करताना निरुक्त ( ६.३२ ) म्हणते की मगन्द वा मदक हे एक अनार्य जाति होते व प्रमगन्द वा प्रमदक हा त्यांचा राजा होता. अप्सरा प्रमन्दिनी मुळात या लोकांची मातृदेवता असली पाहिजे हे उघड आहे. म्हणून वाक् अम्भिणी ही अंभी गणाची मातृदेवता होती व पुष्करावतीच्या नाण्यावरील वशिडाच्या बैलावरून अंभी गण हा महान् सिंधु संस्कृतीचाच प्रत्यक्ष अवशेष होता. असा निष्कर्ष आपण बिनधोकपणे काढू शकतो.

◆ ◆ ◆

संदर्भ —

७९. उक्त, पा. १३८–१४०.
८०. एन्डॉनिएलू, सिलप्पादिकारम् ( इंग्रजी अनुवाद ), इलस्ट्रेटेड विकली, ७–२–६५.
८१. पद्मनाभ मेनन, उक्त, पा. ४२५–४२६.
८२. उक्त, पा. ३०७–३०८.
८३. एन्डॉनिएलू उक्त.
८३. अ. व्ही. कनकसभाइ, द तामिल्स एटीन हंड्रेड इअर्स अँगो, पा. ६६–६७,११२.

८४. एन्डॅनिएलू, उक्त.
८५. पद्मनाभ मेनन, उक्त, पा. ४३१–४३२.
८६. उक्त, पा. ४२४,४२६–४२७.
८७. उक्त, खंड २, पा. २८–२९.
८८. उक्त, पा. ३०.
८९. इरावती कर्वे, उक्त, पा. ४११.
९०. पद्मनाभ मेनन, उक्त, पा. २–३.
९१. उक्त, पा. ३२.
९२. उक्त, खंड, १, पा. ३३६–३३७.
९३. उक्त, खंड २, पा. ११.
९४. उक्त, खंड १, पा. ४२.
९५. उक्त, पा. ३८,३०९–३१०; खंड २, पा. ३७४–३७६.
९६. उक्त, खंड १. पा. ३०९–३१०.; ई. एम्. एस् नंबूदिरीपाद, उक्त पा. ४८–४९.
९७. पद्मनाभ मेनन. उक्त, खंड २, पा. ३७४–३७६.
९८. उक्त, खंड १, पा. ३८,२५०,२५२; खंड २, पा. ३७४–३७६.
९९. उक्त खंड २, पा. २५०,–२५२.
१००. ओ. आर. एहरेनफेल्स, उक्त, पा. ६१,६६.
१०१. उक्त, पा. ६२.
१०२. पद्मनाभ मेनन, उक्त, खंड १, पा. २६०–२६१.
१०३. जगदीश काश्यप ( सं. ), उक्त सोळवखन्धवग्ग, ३,४,१४.
१०४. जातक ( हिंदी ), खंड ५, पा. १२४.
१०५. पद्मनाभ मेनन, खंड २, पा. ९७.
१०६. उक्त, पा. १०९–११०.
१०७. व्ही. कनकसभाइ, उक्त, पा. १२५.
१०८. पद्मनाभ मेनन, उक्त, खंड १, पा. ८१.
१०९. उक्त.
११०. उक्त, खंड २, पा. ८३–८४.
१११. उक्त, पा. ६०–६१.
११२. उक्त, पा. ४१.
११३. उक्त, पा. ५.

११४. उक्त, पा. ११, ३२.
११५. उक्त, पा. ५.
११६. उक्त, खंड १, पा. ४२६–४२८.
११७. पा. ३३.
११८. उक्त, पा. ४६५–४६६.
११९. उक्त, खंड २, पा. २७२–२७३.
१२०. उक्त, पा. ३०.
१२१. व्ही. कनकसभाइ, उक्त, पा. २२७–२२८.
१२२. उक्त, पा. ५३–५५.
१२३. उक्त, पा. ८–९.
१२४. लक्ष्मण सरूप, उक्त, पा. १४४.
१२५. जगदीश काश्यप ( सं. ), विनयपिटक, चुल्लुवग्गपालि, ७.९.१४
१२६. उक्त, पाचित्तियपालि, ५.२९.१९५.
१२७. आ. ई. ह्यूम, द थर्टीन प्रिन्सिपल उपनिषद्स, पा. १७५.
१२८. दा. ध. कोसंबी, द कल्चर अँड सिव्हिलिझेशन ऑफ एन्शंट इंडिया इन हिस्टॉरिकल आउटलाइन, पा. १२०–१२१.
१२९. उक्त, पा. १३४; पट्टा प्लेट ५६.
१३०. उक्त, पा. १३४–१३५.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# महात्मा गांधी*

मोहनदास करमचंद गांधी यांचा जन्म गुजरातमधील पोरबंदर येथे एका सुसंस्कृत व प्रतिष्ठित कुटुंबात २ ऑक्टोबर १८६९ मध्ये झाला. गांधी हे वैष्णव वाणी. गांधींचे आजोबा उत्तमचंद यांना पोरबंदर संस्थानची दिवाणगिरी मिळाली होती. गांधीचे वडील करमचंद हे प्रथम पोरबंदर संस्थानचे व नंतर राजकोट संस्थानचे दिवाण होते. आई पुतळीबाई व वडील हे दोघेही शीलसंपन्न व धर्मनिष्ठ होते. ते नियमाने धार्मिक ग्रंथांचे पठन करीत व आपल्या मुलाबाळांना धार्मिक कथा सांगून सदाचरणाचे महत्त्व त्यांच्या मनावर बिंबवीत. त्या वेळी धार्मिक नाटचप्रयोग फार होत असत; ते पाहण्यात व ध्रुव, प्रल्हाद, हरिश्चंद्र इत्यादींच्या कथा ऐकण्यात मोहनदास बाळपणी सातआठ वर्षांचे असताना रंगून जात. हरिश्चंद्राच्या अद्भुतरम्य कथेचे त्यांना वेडच लागले होते. हरिश्चंद्र नाटक त्यांनी वारंवार पाहिले. अहिंसात्मक सत्याग्रहाला आवश्यक निष्ठेची मनोभूमिका लहानपणीच तयार झाली.

कस्तुरबा व मोहनदास यांचे वय सारखेच होते. या दोघांचा विवाह तेराव्या वर्षी झाला. ही विद्यार्थी दशा होती. घरचे वातावरण शीलसंपन्नांचे असले, तरी बाहेरचे सवंगडी व मित्र निरनिराळ्या कौटुंबिक परिस्थितीतले होते. त्यांनी मांसाहार, धूम्रपान, वेश्यागमन इत्यादी गोष्टींचे प्रलोभन मोहन-दासांना दाखविण्याचा प्रयत्न केला. ते त्यात काही काळ फसलेही. परंतु तीव्र पश्चात्ताप होऊन ते त्यांतून लवकरच बाहेर पडले. १८८७ साली ते मॅट्रिकच्या परीक्षेत उत्तीर्ण झाले.

१८८५ मध्येच करमचंद यांचे निधन झाले. बेचरजी स्वामी यांनी पुतळीबाईंना सांगितले की, मोहनदासाला उच्च वैद्यकीय शिक्षणाकरिता इंग्लंडला पाठवावे. परंतु वैद्याला मृत शरीराला स्पर्श करावा लागतो हे बरे नव्हे, म्हणून बॅरिस्टर होण्याकरिता इंग्लंडला पाठवावे असे वडीलबंधूंनी ठरविले. मोहनदासांना

* मराठी विश्वकोशांतील एक नोंद.

अनुक्रमणिका








ही कल्पना फार आवडली. आई या धाकट्याला परदेशी पाठविण्यास नाखूष होती. परंतु मोहनदासांचा आग्रह पाहून तिने त्यांना मद्य, मांस व परस्त्री वर्ज्य करण्याची शपथ घ्यावयास लावली व ते १८८८ मध्ये इंग्लंडला गेले. या वेळी कस्तुरबाई गरोदर होत्या. १८ व्या वर्षीच हिरालालचा जन्म झाला. रामदास व देवदास नंतर काही वर्षांच्या अंतराने झाले. इंग्लंडमध्ये असताना गांधींनी शाकाहारी मंडळ स्थापन केले. वडिलांच्याच पायापाशी बसून हिंदू, मुसलमान, ख्रिश्चन मित्रांच्या संवादामध्ये अनेक धर्मांच्या तत्त्वांचे जे विचार त्यांनी वारंवार ऐकले, ते इंग्लंडमध्ये गीता, बुद्धचरित्र व बायबल यांच्या वाचनाने अधिकच दृढ झाले.

बॅरिस्टर १० जून, १८९१ ला झाले. तत्पूर्वी लंडनची मॅट्रिक परीक्षाही ते उत्तीर्ण झालेच होते. स्वदेशी परतले. मातेचे निधन झाले होते, ही गोष्ट परतल्यावर कळली. वडीलभावाने परदेश-गमनाबद्दल प्रायश्चित्त घेवविले.

## आफ्रिकेतील सत्याग्रहसंग्रामाचे प्रथम पर्व

भारतात आल्यावर त्यांनी मुंबई येथे वकिली सुरू केली. पण जम बसेना. या वेळी इंग्रजी पद्धतीचा पोषाख ते करीत होते. पोरबंदरच्या एका मुसलमान व्यापाऱ्याने दक्षिण आफ्रिकेतील एका कज्जासाठी गांधींची गाठ घेतली व एक वर्षाच्या कराराने, १८९३ च्या एप्रिलमध्ये दक्षिण आफ्रिकेत नेले. दरबानचा लक्षाधीश व्यापारी दादा अब्दुल्ला याने प्रिटोरिया येथील व्यापारी तय्यबजी यावर ४०,००० पौंडांची फिर्याद केली होती. गांधींनी त्या दोघांचे मन वळवून कज्जाचा निकाल सामोपचाराने करवून घेतला. आफ्रिकेत सुमारे २० वर्षे गांधी राहिले. वकिलीचा अनुभव घेतला. दोन्ही पक्षांच्या अंतःकरणात शिरून, समजूत घालून, कज्जाचा निकाल करणे यात गांधी तरबेज झाले. दक्षिण आफ्रिकेत असताना तेथील बिनगोऱ्या जमातींवरील, विशेषतः हिंदी लोकांवरील, त्याचप्रमाणे तेथील मजूरांवरील होणाऱ्या गोऱ्या सत्ताधाऱ्यांच्या जुलमांविरुद्ध आपल्या सत्याग्रहाचा किंवा निःशस्त्र प्रतिकाराचा दीर्घकालपर्यंत प्रयोग करण्याची संधी त्यांनी साधली. तेथील हिंदू, मुसलमान, ख्रिश्चन इत्यादी जमातींची व दलित जनांची अंतःकरणे काबीज केली. अनेक यूरोपीय मित्रही मिळविले.

दक्षिण आफ्रिकेत प्रसिद्ध तत्त्वज्ञ, सेनापती व सत्ताधारी जनरल स्मट्स यांच्याशी गांधींनी अनेकवेळा सत्याग्रही संग्राम केला. त्या वेळी नाताळ, ट्रान्सवाल व ऑरेंज फ्री स्टेट या तीन स्वतंत्र राज्यांत हिंदी लोकांची स्थिती अस्पृश्यांपेक्षाही वाईट होती. हिंदू मजूर मुदतीच्या कराराने तेथे मोठ्या संख्येने

नेले जात होते. हिंदी व्यापारीही तेथे व्यापाराकरिता वस्ती करून राहिले होते. सर्वच बिनगोऱ्या लोकांना निग्रोंप्रमाणेच वागवीत असत; सर्वांनाच 'कुली' म्हणत. गोऱ्या वस्तीत राहण्याचा त्यांना प्रतिबंध होता. वर्णद्वेषाचे थैमान सुरू होते. वर्णभेदावर आधारलेले अनेक प्रकारचे जुलमी कर लादले होते. वर्णद्वेषावर आधारलेले नियम मोडले, तर गोरे लोक व पोलीस मारहाण करीत; बुटाने तुडवीत.

गांधींनी स्वतः अनेक वेळा असा अपमान व मारहाण सोसली. हिंदू लोकांच्या काही सवलती काढून घेणारे अपमानकारक बिल तेथील विधिमंडळात १८९४ मध्ये आले. गांधी त्या वेळी आफ्रिका सोडून स्वदेशी परतणार होते. परंतु आयत्या वेळी परत येण्याचा बेत रहित करून तेथेच राहून लढा देण्याचा संकल्प त्यांनी सोडला. 'नाताळ इंडियन काँग्रेस' नावाची संस्था त्याकरिता स्थापन केली. सार्वजनिक फंडातील पैसा न घेता वकिली सुरू करून अगदी साधी रहाणी अवलंबिली. 'इंडियन ओपिनियन' हे वृत्तपत्र सुरू केले. सार्वजनिक फंड आंदोलनाकरिता गोळा होत असे; त्याचा पैन् पै चोख हिशेब प्रतिमास सादर करण्याची प्रथा ठेवली. मजुरांवर तेथे रहाण्याबद्दल जादा कर देण्याचे विधेयक विधिमंडळापुढे मान्य झाले होते. याविरुद्ध त्यांनी मोठी चळवळ केली. गोरे लोक त्यामुळे त्यांच्यावर खूप चवताळले होते. याच सुमारास १८९६ च्या जून महिन्यात गांधी भारतीयांना तेथील परिस्थिती समजावून सांगण्याकरिता तात्पुरते भारतास परतले. काही महिने भारतात राहून येथील वृत्तपत्रांत तेथील परिस्थितीबद्दल हृदयविदारक हकीकती त्यांनी प्रसिद्ध केल्या व दक्षिण आफ्रिकेत ते पुनः गेले. याच सुमारास बोअरयुद्ध सुरू झाले. त्यात गांधीजींनी हिंदी लोकांचे शुश्रूषापथक तयार करून दोन्ही बाजूच्या गोऱ्या जखमी सैनिकांची सेवा केली. बोअर युद्धानंतर गांधींनी भारताला भेट दिली. १९०३ साली गांधी आफ्रिकेस पुन्हा परत गेले. तेथील दडपशाहीच्या कायद्याविरुद्ध त्यांनी सत्याग्रहाची चळवळ उभारली. त्यात कस्तुरबासह अनेक स्त्रियांनीही भाग घेतला व कारावास भोगला. काळ्या कायद्याविरुद्ध कायदेभंगाच्या चळवळीला १९०७ मध्ये उग्र रूप आले. १९०८ मध्ये शेकडो हिंदी लोकांना कारावासाच्या शिक्षा झाल्या. गांधींनाही सक्तमजुरीची शिक्षा झाली. या सत्याग्रहाचे पडसाद आफ्रिकेप्रमाणेच इंग्लंड व हिंदुस्थान येथेही उमटले. १९१२ साली गोपाळ कृष्ण गोखले हे जनरल स्मट्सने 'काळा कायदा' रद्द करावा म्हणून आफ्रिकेत आले. तेव्हापासून गांधी व गोखले यांचा स्नेह जमला. गांधी, गोखले यांस आपले राजकीय गुरू म्हणून अत्यंत पूज्य मानू लागले. १८

अनुक्रमणिका





डिसेंबर १९१३ रोजी गांधींना स्मट्सने बंधमुक्त केले व २१ जानेवारी १९१४ रोजी वर्णविद्वेषाच्या कायद्याच्या बाबतीत गांधी व स्मट्स यांच्यात तडजोड झाली.

आफ्रिकेतील त्यांच्या वीस वर्षांच्या वास्तव्यात त्यांनी रस्किनचे "अनटु धिस् लास्ट," टॉलस्टॉयचे "किंग्डम ऑफ गॉड" व थोरोचे निबंध वाचले. रस्किनच्या पुस्तकाचे त्यांनी "सर्वोदय" म्हणून गुजरातीत भाषांतर केले. दरबान शहराजवळ सुमारे चाळीस हेक्टर जमीन खरेदी करून "फिनिक्स आश्रम" स्थापन केला. तेथूनच ते "इंडियन ओपिनियन" हे साप्ताहिक छापून प्रसिद्ध करू लागले. गांधी स्वतः शेतकाम करीत, छापखान्यात यंत्रेही फिरवीत. नंतर त्यांनी जोहॅनिसबर्गजवळ सुमारे ४४० हेक्टर जागेत 'टॉलस्टाय फार्म' स्थापिला. १९१३ मधील सत्त्याग्रह आंदोलनाची छावणी येथेच पडली होती. तत्पूर्वी त्यांनी १९०८ साली लंडनहून दक्षिण आफ्रिकेत परत जात असताना 'हिंद स्वराज्य' हे पुस्तक प्रश्नोत्तररूपाने लिहून प्रसिद्ध केले. या पुस्तकात, यांत्रिक उद्योगाने मानवाचा ऱ्हास होत आहे, हा विचार त्यांनी मांडला.

## भारतातील सार्वजनिक जीवन

गांधी दक्षिण आफ्रिकेला कायमचा रामराम ठोकून इंग्लंडमार्गे ९ जानेवारी १९१५रोजी मुंबईस परत आले. त्याना नामदार गोखले यांनी, भारतात गेल्यावर एक वर्षपर्यंत सार्वजनिक चळवळीत न पडता केवळ तटस्थपणे परिस्थिती समजावून घ्या, असे बजावून सांगितले होते. मुंबई, मद्रास इत्यादी शहरांमध्ये त्यांच्या सत्काराच्या सभा झाल्या. गांधींनी हरद्वारचे गुरुकुल व शांतिनिकेतन यांस भेटी दिल्या. हरद्वार येथे कांगडी गुरुकुलाचे आचार्य श्रद्धानंद यांची गाठ पडली. त्यांनीच प्रथम गांधींचा 'महात्मा' म्हणून निर्देश करून गौरव केला. अहमदाबाद येथे साबरमती तीरावर २५ मे १९१५ रोजी 'सत्याग्रहाश्रम' स्थापन केला. आश्रमात रहाणाऱ्या एका अस्पृश्यामुळे अहमदाबाद येथील व्यापाऱ्यांनी आश्रमास देणग्या देण्याचे बंद केले; आश्रम बंद पडण्याची वेळ आली. परंतु गांधींनी अस्पृश्यांना आश्रमात ठेवण्याचा आग्रह चालू ठेवला. हळूहळू पुनः अनुदान मिळू लागले व आश्रम स्थिरावला. विनोबा भावे, काकासाहेब कालेलकर, संगीतज्ञ खरे गुरुजी, गोपाळराव काळे, महादेवभाई देसाई, जे. बी. कृपलानी, किशोरलाल मश्रुवाला, प्यारेलाल इत्यादी गांधींचे अनुयायी आश्रमी बनले. हा सत्याग्रहाश्रम तेव्हापासून हळूहळू भारताच्या राजकीय स्वातंत्र्याच्या आंदोलनाचे मुख्य केंद्र बनला.

अनुक्रमणिका

हिंदू विश्वविद्यालयाचा स्थापना समारंभ ४ फेब्रुवारी १९१६ रोजी झाला; त्या सभेत व्हाइसरॉय लॉर्ड हर्डिंग्ज, ॲनी बेझंट, हिंदी महाराजे, त्यांच्या राण्या, उच्चपदस्थ अधिकारी व अनेक पुढारी उपस्थित होते. या सभेत गांधींनी भाषण केले. ते म्हणाले : कालच्या चर्चेमध्ये भारताच्या गरिबीबद्दल मुक्त कंठाने भाषणे झाली. पॅरिसच्या जवाहिऱ्यालाही दिपवून टाकणाऱ्या जडजवाहिरांनी मंडित राजेमंडळी येथे बसलेली आहेत. भारताची गरिबी नष्ट करावयाची तर अगोदर, डोळे दिपविणारे जडजवाहीर राजेमहाराजांपाशी आहे, तेच काढून घेऊन त्याचा भारताच्या जनतेकरिता निधी निर्माण करावा. हे सर्व धन गरीब शेतकऱ्यांच्या श्रमातून निर्माण झाले आहे. शेतकऱ्याची मुक्ती शेतकरीच करू शकेल. वकील, डॉक्टर, जमीनदार हे करू शकणार नाहीत." अशा अर्थाचे भाषण चालू असताना ॲनी बेझंट यांनी गांधींना हटकले व भाषण बंद करण्यास सांगितले. गांधी थांबले नाहीत. बेझंटनी ती सभा रागावून बरखास्त केली.

गांधींनी १९१७ मध्ये शेतकऱ्यांच्या व्यथा जाणून घेण्यासाठी बिहारमधील चंपारण्यास भेट दिली. त्या परिसरात गोऱ्या लोकांचे उसाचे व निळीचे मळे होते व तेथील हिंदी शेतकरी त्यांची कुळे होती. हे मळेवाले शेतकऱ्यांना छळीत, लुबाडीत, मारीत व त्यांची आर्थिक पिळवणूक करीत. ब्रिटिश सरकारने गांधींना चंपारण्य सोडून जाण्याचा हुकूम दिला. तो गांधींनी मानला नाही. या वेळी राजेंद्रप्रसाद, ब्रिजकिशोर, मझरूल हक इत्यादींचा परिचय झाला. चंपारण्य जिल्ह्यातील ८५० खेड्यांतील सुमारे ८००० शेतकऱ्यांच्या तक्रारी गांधींनी लिहून घेतल्या. १३ जून १९१७ रोजी सरकारला चौकशी समिती नेमावी लागली. समितीच्या शिफारशीप्रमाणे सरकारने शेतकऱ्यांकडून खंड कमी घेतला जाईल, वेठबिगार रद्द होईल व इतर जुलमी प्रकार होणार नाहीत असे १८ ऑक्टोबर रोजी जाहीर केले.

चंपारण्य सत्याग्रहामुळे गांधीजींचे भारतीय नेतृत्व चमकू लागले. अहमदाबादच्या मजुरांच्या तुटपुंज्या पगाराचा प्रश्न उत्पन्न झाला. युद्धजन्य महागाई शिगेस पोचली होती. मजुरांचा सत्तर टक्के बोनस गिरणीवाल्यांनी रद्द करण्याचे जाहीर केले. सुमारे ८०,००० मजुरांनी सत्याग्रह करण्याचा बेत केला. बावीस दिवस संप चालला. गांधींनी मजुरांचा संप टिकविण्याकरिता उपोषण सुरू केले. तीन दिवसांत यश आले. मालकांनी ३५ % पगारवाढ मान्य केली. असे तंटे पुनः होऊ नयेत म्हणून 'मजूर-महाजन' नावाची संस्था स्थापन झाली. मजुरांप्रमाणे शेतकऱ्यांचाही प्रश्न याच साली उत्पन्न झाला. खेडा जिल्ह्यात भयंकर दुष्काळ पडला; तरी सरकार, चार आणेच पीक येऊनदेखील, शेतसारा वसूल





करू लागले. गांधींनी करबंदीची चळवळ हाती घेतली. ही चळवळ पसरू लागली म्हणून सरकार नमले व शेतसारा माफ झाला.

पहिल्या जागतिक युद्धात भारतीयांनी मित्र राष्ट्रांना मदत करावी म्हणून १९१७ साली व्हाईसरॉय लॉर्ड चेम्सफर्ड याने भारतीयांची परिषद बोलावली. त्या परिषदेत गांधींनी हिंदीमध्ये भाषण करून सैन्यभरतीला पाठिंबा दिला. या बाबतीत लोकमान्य टिळकांचे असे म्हणणे होते की, भारतीयांना स्वराज्याच्या अधिकारांचे आश्वासन मिळाले, तरच सैन्यभरतीला पाठिंबा द्यावा. गांधींनी बिनशर्तच पाठिंबा दिला. दक्षिण आफ्रिकेतील चळवळींपासून गांधींचा व दीनबंधू सी. एफ. अँड्रूज या ख्रिश्चन धर्मप्रचारकाचा स्नेह जमला होता. ब्रिटिश सरकारचे भारतातील प्रतिनिधी आणि गांधी यांच्या मधला अँड्रूज हे एक महत्वाचा दुवा बनले. सैन्यभरतीच्या प्रचाराकरिता देशभर फिरत असता गांधींची प्रकृती अत्यंत परिश्रमाने ढासळली. अतिसाराचा विकार जडला. अंगात बारीक तापही सारखा राहू लागला. खेडा जिल्ह्याच्या सत्याग्रहापासून वल्लभभाई पटेल यांचा स्नेहसंबंध वाढू लागला होता. वल्लभभाई अहमदाबादला गांधींना भेटावयास आले. वल्लभभाईंनी औषधोपचार घ्यावा असा त्यांना आग्रह केला. सुप्रसिद्ध डॉक्टर कानुंगो यांनी प्रकृतीत लवकर सुधारणा व्हावी म्हणून औषधे व इंजक्शन घेण्याचा आग्रह केला. गांधींनी तो नाकारला. एके दिवशी रात्री या दीर्घ आजारात गांधींना वाटू लागले की, आपली अखेरची वेळ आली आहे. वल्लभभाईंनी पुन्हा डॉ. कानुंगोंना प्रकृती तपासण्यास बोलाविले, त्यांनी नाडी तपासली. डॉक्टर म्हणाले "तशी भीती नाही, अत्यंत अशक्ततेमुळे मात्र मज्जातंतू क्षीण झाले आहेत." शेवटी एकच उपाय उपयोगी पडला; सर्व शरीराला बर्फाचा लेप केला होता. गांधी या आजारातून बाहेर पडले. निसर्गोपचारावर त्यांची फार भिस्त. आश्रमात कोणी आजारी पडले, तरी उपवास व निसर्गोपचार यांवरच ते भर देत.

जर्मनांचा पराभव होऊन पहिले जागतिक युद्ध १९१८ साली संपले; ब्रिटन विजयी झाले. ब्रिटिश राज्यकर्त्यांनी मुसलमानांची खिलाफत तोडून तिचे अनेक भाग केले. भारतातील मुसलमान त्यामुळे संतप्त झाले. ब्रिटिश सरकारने मॉंटेग्यू चेम्सफर्ड समिती भारताच्या राजकीय हक्कासंबंधी शिफारशी करण्याकरिता नेमली. त्यात स्वराज्याचे हक्क नव्हतेच. लोकप्रतिनिधींची कायदेमंडळे व द्विदल राज्यपद्धती देण्याचे मात्र ठरले; परंतु गव्हर्नरांचे व केंद्र सरकारचे वरिष्ठ अधिकार कायम ठेवले. भारतात असंतोष पसरत होता तो दाबून टाकण्याकरिता न्यायमूर्ती रौलट यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या समितीच्या

अनुक्रमणिका

शिफारशीप्रमाणे दडपशाहीचा कायदा केंद्र सरकारने मंजूर केला. या कायद्याच्या विरुद्ध गांधींनी सत्याग्रहाची चळवळ उभारली. गांधींनी भारतभर दौरा सुरू केला. ६ एप्रिल १९१९ रोजी देशभर हरताळ पाळण्यात आला. हिंदू व मुसलमान यांच्यामध्ये प्रचंड एकजूट घडून आली. पंजाब सरकारने पंजाबमध्ये शिरण्याची गांधींना मनाई केली. पंजाब सरकारने त्यांना अटक करून परत मुंबईला पाठविले. देशभर असंतोष वाढला. जालियनवाला हत्याकांडामुळे गांधींनी सुरू केलेला सत्याग्रह तात्पुरता तहकूब केला. काँग्रेसने पंडित मदनमोहन मालवीय, मोतीलाल नेहरू, चित्तरंजन दास, उमर सोमानी इत्यादिकांची पंजाबात व अन्यत्र झालेल्या अत्याचारांच्या चौकशीकरिता समिती नेमली. १४ ऑक्टोबर १९२१ रोजी सरकारनेही लॉर्ड हंटर यांच्या अध्यक्षतेखाली पाच गोरे व तीन हिंदी गृहस्थ यांची समिती नेमली. या समितीपुढे सत्याग्रहाचे प्रवर्तक म्हणून गांधींचीही साक्ष झाली. काँग्रेस समितीने असा निर्णय दिला की लोकांना हिंसक मार्गापासून परावृत्त करण्याकरिता हरताळ पाळण्यात आला होता. सत्याग्रहाची चळवळ हे सरकारविरुद्ध बंड होते; परंतु सरकारच्याही हातून अन्याय झाले अशी कबुली हंटर कमिटीने दिली. १९२० साली नागपूर येथे काँग्रेसचे अधिवेशन भरले; त्यात असहकारितेचे आंदोलन सुरू करण्याचा ठराव मान्य करण्यात आला. खिलाफतीचे पुनरुज्जीवन करण्याची चळवळही याच चळवळीबरोबर उभारली. देशभर सभा, मिरवणुका, प्रभात फेऱ्या निघू लागल्या. कायदेमंडळावर देशातील शेकडो प्रतिनिधींनी बहिष्कार घातला. हजारो लोकांनी सरकारी नोकऱ्या सोडल्या. अनेक वकिलांनी व बॅरिस्टरांनी वकिलीची कामे सोडली. परदेशी मालावर व ब्रिटिश कापडावर बहिष्कार टाकण्याचे आंदोलन देशभर पसरले. राष्ट्रीय शिक्षणाच्या खाजगी संस्था स्थापण्यात आल्या. यामुळे ब्रिटिश सरकारने दडपशाही सुरू केली. लक्षावधी लोकांना कारावासात टाकले. गांधींनी या अनत्याचारी असहकारतेची शेवटची पायरी म्हणून सामुदायिक कायदेभंग व करबंदी करण्याच्या चळवळीच्या संकल्प सोडला. बारडोली तालुक्यात ही चळवळ सुरू करावयाचे ठरविले. गांधीनी बारडोली येथेच आपला मुक्काम ठेवला. परंतु उत्तर प्रदेशात चौरीचौरा येथे दंगे होऊन लोकांनी जाळपोळ केली व त्यात पोलीसांची हत्या झाली. त्यामुळे गांधींनी काँग्रेसच्या मुख्य कार्यकारिणीची बारडोली येथे ११ व १२ फेब्रुवारी १९२२ रोजी बैठक बोलावून बारडोलीचा सत्याग्रह तहकूब ठेवला. महात्मा गांधींना त्यानंतर १० मार्च रोजी अहमदाबाद येथे पकडण्यात येऊन राजद्रोहाच्या आरोपाखाली सहा वर्षांच्या कैदेची शिक्षा ठोठावण्यात आली. गांधींनी न्यायालयापुढे आपण राजद्रोह केला हे मान्य

केले व सांगितले : "ब्रिटिश राज्यपद्धती व तिचा कायदा हा भारतीय जनतेच्या हिताच्या विरुद्ध आहे. मी बादशहाविरुद्ध अप्रीती उत्पन्न केली नाही, तर ब्रिटिशांच्या राज्यपद्धतीविषयी अप्रीती उत्पन्न केली आहे. अशी अप्रीती उत्पन्न करणे हे कर्तव्य व सद्‌गुणाचे दर्शन मी समजतो." न्यायाधीश ब्रुमफील्ड यांनी निकाल देताना सांगितले : 'तुमचे ध्येय उच्च व तुमचे वर्तन थोर, साधूला शोभण्यासारखे आहे. परंतु तुमच्या सत्याग्रहाचा उद्देश उच्च व प्रयत्न अत्याचाराविरुद्ध असले तरीही अत्याचार घडले; म्हणून तुम्हास मोठ्या खेदाने मला शिक्षा सुनवावी लागत आहे. सहा वर्षांची साध्या कैदेची शिक्षा मी फर्मावितो. "येरवडा जेलमध्ये गांधींना रवाना केले. तेथे १९२४ साली त्यांचा आंत्रपुच्छशोथ हा विकार बळावला: त्यांच्यावर शस्त्रक्रिया करण्यात आली. ५ फेब्रुवारीला त्यांना मुक्त करण्यात आले.

त्यानंतर गांधींनी ब्रिटिश राज्यकर्त्यांशी लढा न करता, सामाजिक सुधारणांसारख्या विधायक कार्यक्रमास वाहून घेतले. मोतीलाल नेहरू, चित्तरंजन दास, विठ्ठलभाई पटेल इत्यादी काँग्रेस नेत्यांनी स्वराज्य पक्ष स्थापून कायदेमंडळात स्वराज्याच्या हक्कांकरिता झगडायचे ठरविले. हिंदू–मुस्लिम ऐक्य, अस्पृश्यतानिवारण, खादीग्रामोद्योग, गावसफाई इत्यादी कार्यक्रम गांधींनी हाती घेतले. गांधींनी देशभर प्रवास करून प्रचार केला. राजगोपालाचारी, जवाहरलाल नेहरू हे गांधींच्याच विधायक कार्यक्रमात सहकार्य करू लागले व गांधींच्या कार्यक्रमाचे ते समर्थक बनले. काँग्रेसमधील एम्. आर्. जयकर, न. चिं. केळकर, मदनमोहन मालवीय इत्यादी मंडळी, मुसलमानांचे मन वळविणे अशक्य आहे, असे म्हणून हिंदुमहासभेकडे वळली. काँग्रेसमधील महमद अल्लीसारखे मुसलमान नेते, बॅ. जिना, सर अली इमाम यांनी डिसेंबर, १९२५ मध्ये अलीगढ येथे मुस्लिम लीगचे अधिवेशन भरवून मुसलमानांची फळी उभी केली.

भारतातील राजकीय असंतोष केंद्राच्या व प्रांतांच्या विधिमंडळात शिरलेल्या स्वराज्यपक्षाच्या द्वारे वारंवार प्रकट होऊ लागला; हे पाहून नवे आंदोलन उद्‌भवण्याच्या अगोदरच राजकीय स्वयंनिर्णयाचे हक्क वाढवावे म्हणून ब्रिटिश राज्यकर्त्यांनी 'सायमन आयोग' नेमण्याचे ठरविले. ३ फेब्रुवारी १९२८ ला सायमन आयोग मुंबई बंदरात उतरला. तेव्हापासून त्याविरुद्ध निदर्शने सुरू झाली. देशभर ब्रिटिशविरोधी निदर्शनांचे थैमान सुरू झाले. काँग्रेसने सायमन आयोगावर बहिष्कार घालण्याचा निर्णय घेतला होता. लाहोरला लाला लजपतराय व लखनौला जवाहरलाल नेहरू यांच्यावर, उग्र निदर्शने चालू असताना, लाठीहल्ला झाला. लाला लजपतराय या लाठीहल्ल्याने

अनुक्रमणिका

उत्पन्न झालेल्या दुखण्यातच कालवश झाले. भारताचे राजकीय वातावरण तप्त झाले, हे पाहून पंडित जवाहरलाल नेहरू व सुभाषचंद्र बोस यांनी कांग्रेसचे उद्दिष्ट संपूर्ण स्वातंत्र्य जाहीर करण्याचे ठरविले. गांधी साम्राज्यांतर्गत स्वराज्याचे समर्थक होते या दोघांना त्यांनी आश्वासन दिले की ३१ डिसेंबर १९२९ पर्यंत साम्राज्यांतर्गत स्वराज्य मिळाले नाही, तर मी संपूर्ण-स्वातंत्र्यवाला होईन. त्याच सुमारास भगतसिंग इत्यादी सशस्त्र क्रांतिकारकांच्या हालचाली सुरू झालेल्या गांधींच्या लक्षात आल्या. लॉर्ड आर्यविन याच्या आगगाडीखाली नवी दिल्ली स्टेशनजवळ बाँबस्फोट झाला. भारताच्या राजकीय चळवळीला हिंसक वळण मिळणार असे दिसू लागले. ते टाळण्याकरिता गांधींनी १९३० साली सविनय कायंभंगाची घोषणा केली. १२ मार्च १९३० ला सकाळी ६.३० वाजता साबरमती आश्रमातून गांधींनी स्वराज्य मिळाल्याशिवाय परत येणार नाही, अशी प्रतिज्ञा करून समुद्रकिनाऱ्यावरील दांडीकडे मिठाचा कायदा तोडण्याकरिता ७२ सत्याग्रही वीरांसह यात्रा सुरू केली. ६ एप्रिलला यात्रा संपली. गांधींनी बेकायदेशीर रीतीने मीठ गोळा केले. देशभर मिठाचा कायदा मोडणारे सत्याग्रह आंदोलन उभे राहिले. ४ मे १९३० रोजी पहाटे गांधींना कराडी या गावी अटक झाली येरवड्याच्या तुरुंगात सरकारने त्यांची रवानगी केली. देशामध्ये लक्षावधी लोक कायदेभंग करून कारावासाची शिक्षा भोगू लागले. २५ जानेवारी १९३१ रोजी शांततामय वातावरण निर्माण करण्याकरिता लॉर्ड आर्यविन यांनी गांधींची बिनशर्त सुटका केली. गांधी व आर्यविन यांच्यात वाटाघाटी सुरू होऊन ४ मार्च १९३१ रोजी 'गांधी-आर्यविन करार' झाला.

भारताच्या राजकीय स्वयंनिर्णयाच्या हक्काचा प्रश्न चांगल्या रीतीने सोडविण्याकरिता इंग्लंडमध्ये नोव्हेंबर १९३१ मध्ये भारतीय प्रतिनिधींची गोलमेज परिषद भरली. गांधी त्या परिषदेस उपस्थित राहिले. इंग्लंडमध्ये त्या वेळी कमरेला पंचा, अंगावर उबदार साधी शाल व पायात वहाणा असा त्यांचा पोषाख होता. गोलमेज परिषदेमध्ये भाषण करताना गांधींनी सांगितले की, ब्रिटिश प्रजाजन म्हणविण्यात मला एके काळी अभिमान वाटत होता; आता बंडखोर म्हणून घेणे मला जास्त आवडेल. हिंदू, मुसलमान, स्पृश्य व अस्पृश्य यांना विभक्त मतदार संघ द्यावे की नाही याबद्दल तेथे हिंदी प्रतिनिधींमध्ये मतभेद झाले. अशा प्रकारची जातीयता स्वराज्यात राहू नये, त्याकरिता प्राण गेले तरी चालतील, असे गांधींनी त्या परिषदेत निकराने जाहीर केले. भारतात आल्यावर ३ जानेवारी १९३२ रोजी गांधींना अटक झाली.

त्यानंतर वल्लभभाई पटेल, जवाहरलाल नेहरू, राजेंद्रबाबू, सुभाषचंद्र बोस, डॉ. अन्सारी, आझाद, कस्तुरबा, कमला नेहरू इत्यादी राष्ट्रीय नेत्यांना ब्रिटिश सरकारने अटक करून त्यांची कारागृहात रवानगी केली. १८ ऑगस्ट १९३२ रोजी ब्रिटिश राज्यकर्त्यांनी डॉ. भी. रा. ऊर्फ बाबासाहेब आंबेडकरांच्या आग्रहावरून अस्पृश्यांना विभक्त मतदारसंघ दिल्याचे जाहीर केले. हे ऐकल्यानंतर गांधींनी २० सप्टेंबर रोजी या प्रश्नावर प्राणांतिक उपोषण सुरू केले. डॉ. आंबेडकरांशी त्यांनी वाटाघाटी केल्या. तारीख २६ रोजी गांधींचा जीव वाचविण्याकरिता डॉ. आंबेडकरांनी तडजोड केली व 'येरवडा करार' झाला. ८ मे १९३३ पासून त्यांनी पापाचे प्रायश्चित्त म्हणून २१ दिवसांचे उपोषण सुरू केले. सरकारने त्यांची लगेच मुक्तता केली. १२ जुलै १९३३ रोजी गांधींनी सामुदायिक सत्याग्रहाचे आंदोलन मागे घेतले. परंतु त्यांनी १९३४ मध्ये वैयक्तिक कायदेभंग सुरू केला. त्यातही पुन्हा त्यांना एक वर्षाची कैदेची शिक्षा झाली. परंतु पुन्हा उपोषण सुरू केल्यामुळे सरकारने त्यांची काही दिवसांनी मुक्तता केली. जानेवारी १९३४ मध्ये बिहार येथे भयंकर धरणीकंप झाला. हजारो लोक मेले, लाखो घरे जमीनदोस्त झाली. गांधींनी भूकंपग्रस्त भागात फिरून लोकांची सेवा केली. गांधींनी जमनालाल बजाज या आपल्या एका थोर अनुयायीच्या सांगण्यावरून वर्धा येथील सेवाग्राम येथे आश्रम स्थापन केला. तेथे ते अखेरपर्यंत राहिले व विधायक कार्यक्रमाला पुन्हा त्यांनी वाहून घेतले.

त्यांनी १९३८ मध्ये बंगालचा दौरा केला. बंगाल हे सशस्त्र क्रांतिकारकांचे केंद्रस्थान होते. शेकडो सशस्त्र क्रांतिकारक कारावासात खितपत पडले होते त्यांना ब्रिटिश सत्ताधाऱ्यांशी विचारविनिमय करून त्यांनी बंधमुक्त केले.
प्रांतिक व केंद्रीय निवडणुकीत १९३७ मध्ये बंगाल व पंजाब सोडून बहुतेक प्रांतांमध्ये काँग्रेस बहुमताने निवडून आली. सात प्रांतांमध्ये काँग्रेस मंत्रिमंडळाचे राज्य झाले होते. दुसरे जागतिकयुद्ध १९३९ मध्ये सुरू युद्धसहकार्य नाकारून गांधींच्या सल्ल्याप्रमाणे या काँग्रेसच्या मंत्रिमंडळांनी राजीनामे दिले. बॅ. जिनांच्या सल्ल्यानुसार मुस्लिम लीगने काँग्रेस मंत्रिमंडळ बरखास्त झाल्यामुळे देशभर 'मुक्तिदिन' साजरा केला. १९४१ च्या एप्रिलमध्ये गांधींनी पुन्हा वैयक्तिक सत्याग्रह सुरू केला. भारतात शांतता नांदावी, युद्धप्रयत्नास साहाय्य व्हावे, म्हणून ११ मार्च रोजी भारताला स्वराज्याचे हक्क युद्ध संपल्याबरोबर द्यावेत असे चर्चिल यांच्या मंत्रिमंडळाने ठरवून सर स्टॅफर्ड क्रिप्स यांचा आयोग भारताकडे पाठविला. गांधी प्रभृती नेते व क्रिप्स यांच्यात वाटाघाटी झाल्या, परंतु त्या अखेर फिसकटल्या. याचे कारण, गांधींना युद्धसहकार्य करायचे नव्हते. गांधींनी







ब्रिटिशांना विरोध न करण्याचे युद्धारंभीचे धोरण नंतर बदलले होते. म्हणून त्या वेळचे व्हाइसरॉय वेव्हेल यांनी 'गांधी शब्दाचे पक्के नव्हते' अशा अर्थाचे विधान या संदर्भात केले असावे. गांधींनी ८ ऑगस्ट १९४२ रोजी अखिल भारतीय कॉंग्रेस समितीची मुंबई येथे बैठक बोलावली. त्या बैठकीत त्यांनी भारत स्वतंत्र झाला आहे, असा निर्णय जाहीर केला आणि 'भारत छोडो'चे आंदोलन देशभर सुरू केले. गांधींनी लोकांना सांगितले की, 'करा किंवा मरा.' ९ ऑगस्ट रोजी गांधींसह शेकडो नेत्यांची धरपकड झाली व त्यांना कारागृहात डांबण्यात आले. गांधींना पुणे येथील आगाखान बंगल्यात स्थानबद्ध केले. त्यांच्याजवळ कस्तुरबा, महादेव देसाई, डॉ. गिल्डर, डॉ. सुशीला नायर, सरोजिनी नायडू इत्यादींना ठेवले. महादेव देसाई हे गांधींचे चिटणीस. त्यांना तेथेच मृत्यू आला. गांधींच्या पत्नी कस्तुरबा ह्या हृदयविकाराने आजारी होत्या. २२ फेब्रुवारी १९४३ ला त्यांना मृत्यू आला. या अत्यंत प्रियजनांचा वियोग गांधींनी मोठ्या धैर्याने सहन केला. कस्तुरबांनी गांधींबरोबर मोठ्या निष्ठेने आदर्श पतिव्रता म्हणून जीवन व्यतीत केले. ६ मे १९४४ साली गांधीजींची बिनशर्त मुक्तता झाली. २ ऑक्टोबर १९४४ रोजी एक कोटी बारा लाखांचा कस्तुरबा निधी सेवाग्राम येथे गांधींच्या स्वाधीन करण्यात आला. कॉंग्रेस कार्यकारिणीचे जवाहरलाल नेहरू प्रभृती सभासद व अन्य नेते यांची जून १९४५ मध्ये कारागृहातून मुक्तता झाली. १९४६ मध्ये इंग्लंडमधे मजूर पक्षाचे मंत्रिमंडळ ॲटली यांच्या नेतृत्वाखाली सत्तारूढ झाले. त्यांनी मे १९४६ ला भारताच्या स्वराज्याची योजना तयार केली. संविधान परिषद व हंगामी राष्ट्रीय मंत्रिमंडळ बनविण्याचा अधिकार भारताला त्या योजनेप्रमाणे मिळाला. २९ जुलै १९४६ रोजी मुस्लिम लीगने पाकिस्तानच्या मागणीकरिता आंदोलन उभारले. भारताची फाळणी अपरिहार्य झाली. गांधींना ती मुळीच मान्य नव्हती. "एक वेळ माझ्या देहाचे दोन तुकडे पडले, तरी चालेल, पण भारताची फाळणी मी होऊ देणार नाही" असे गांधींनी जाहीर केले. परंतु ३ जून १९४७ रोजी जवाहरलाल नेहरू, सरदार वल्लभभाई पटेल इत्यादी नेत्यांनी भारताची फाळणी मान्य केली. या सुमारास हिंदू-मुसलमानांचे यादवी युद्ध देशभर पेटले. १५ ऑगस्ट १९४७ रोजी भारताचे स्वातंत्र्य जाहीर झाले. हिंदू-मुसलमानांच्या भयंकर कत्तली चालूच होत्या. गांधींनी दिल्लीतील वातावरण शांत होईपर्यंत उपोषण करण्याचे जाहीर केले. १३ जानेवारी १९४८ रोजी बेमुदत उपोषण सुरू केले. भारत सरकारने पाकिस्तानचे ५५ कोट रुपये परत करावे, अशी गांधींची मागणी होती. ही मागणी वल्लभभाई प्रभृती नेत्यांना मान्य

अनुक्रमणिका

नव्हती. परंतु गांधींचा जीव वाचविण्याकरिता ती अखेर मान्य करावी लागली. १६ जानेवारी रोजी गांधींनी उपोषण सोडले.

३० जानेवारी १९४८ चा दिवस उजाडला. कॉंग्रेसने सत्तेचा स्वीकार न करता जनतेच्या दारिद्र्याचे प्रश्न सोडवावेत, विधायक कार्यक्रमाला वाहून घ्यावे, म्हणून लोकसेवक संघ योजना गांधींनी तयार केली. ग्रामराज्य हा भारतीय स्वराज्याचा पाया बनावा, असे भारताच्या संविधानाचे तत्त्व त्यात समाविष्ट केले. राष्ट्रीय मंत्रिमंडळात पंडित जवाहरलाल नेहरू व सरदार वल्लभभाई पटेल यांच्यात तीव्र मतभेद उद्भवले होते. गांधीजींनी सरदारांना पटविले की, ही फूट देशास अहितकारक आहे. संध्याकाळी ५ वाजले. त्यावेळी बिर्ला भवनमधून गांधी प्रार्थनास्थानाकडे जातानाच पुण्याचे नथूराम गोडसे हे नारायण आपटे या साथीदारासह त्या प्रार्थनेच्या सभेत शिरले. गांधींच्या जवळ जाऊन प्रणाम करून नथुराम गोडसे यांनी गांधींच्या अंगावर गोळ्या झाडल्या. गांधी 'राम' म्हणत धरणीतलावर पडले आणि गतप्राण झाले. भारतीय जनता दुःखसागरात बुडाली. जगातील मोठमोठे नेते, विचारवंत, शास्त्रज्ञ, विज्ञानवेत्ते, कलाकार दुःखाने व्यथित झाले. सर्वश्रेष्ठ विज्ञानवेत्ते ॲल्बर्ट आइन्स्टाइन यांना ही वार्ता कळल्याबरोबर त्यांनी उद्गार काढले की "असा महान् माणूस भूतलावर वावरत होता, याचेच आश्चर्य वाटते." अनेक तत्त्ववेत्त्यांनी म्हटले की, मानवजातीला पापातून मुक्त करणारा व शांततेचे मानवी विश्व भविष्यकाली निर्माण होईल, अशी आशा निर्माण करणारा हा माणूस होता. 'राष्ट्रपिता' म्हणून सर्वश्रेष्ठ अद्वितीय बहुमान गांधींना प्राप्त झाला.

## गांधी, वृत्तपत्रकार

गांधींनी आपल्या राजकीय विचारसरणीचा आणि तत्त्वज्ञानाचा प्रचार करण्याकरिता ७ एप्रिल, १९१९ पासून 'सत्याग्रही' संपादकीय नावाखाली 'सत्याग्रह' नावाचे साप्ताहिक सरकारी परवान्याशिवाय प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली होती. मुंबईस 'बाँबे क्रॉनिकल' नावाचे दैनिक बी. जी. हॉर्निमन यांनी चालविले होते. गांधींनी त्याचे संपादक व्हावे अशी त्यांना विनंती करण्यात आली. गांधींनी नाखुषीने कबुली दिली, परंतु सरकारने ते दैनिक प्रकाशित करण्यास मनाई करणारा हुकूम सोडला. गांधीजींच्या ते पथ्यावर पडले. काही गुजराती मंडळींनी 'यंग इंडिया' हे गुजराती नियतकालिक सुरू केले होते. त्याचे संपादक व्हावे अशी त्यांना विनंती करण्यात आली. 'यंग इंडिया' व

'नवजीवन' ही नियतकालिके १९१९ पासून गांधींच्या संपादकत्वाखाली प्रसिद्ध होऊ लागली. नवा विचार, नवी भाषा, नवी वृत्तपत्रपद्धती आणि कसल्याही जाहिराती नसणे. ही या नियतकालिकांची वैशिष्ट्ये होती. 'ना फायदा ना तोटा' या पद्धतीने ही प्रकाशने चालू राहिली. चरखा व स्वदेशी, हरिजन सेवा, सत्याग्रहाचे व असहकारितेचे आंदोलन, आध्यात्मिक जीवनपद्धती, अहिंसेचा महिमा, ग्रामोद्योग, हिंदू-मुस्लिम ऐक्य, अस्पृश्यतानिवारण इत्यादी विषयांवर सुंदर इंग्रजीत व गुजरातीमध्ये लेखन प्रसिद्ध होऊ लागले गांधींच्या शैलीतून वाचकांना विशेष प्रेरणा मिळत होती. ११ फेब्रुवारी १९३३ ला 'हरिजन' साप्ताहिक गांधींनी सुरू केले. त्या वेळी ते येरवडा जेलमध्ये होते. 'हरिजन' ची हिंदी आवृत्तीही निघू लागली. 'यंग इंडिया' बंद झाला होता. ८ ऑगस्ट १९४२ च्या चळवळीत गांधींना अटक झाल्यावर 'हरिजन' वृत्तपत्रही बंद पडले. १० फेब्रुवारी १९४६ मध्ये पुन्हा त्याचे प्रकाशन सुरू झाले. १५ फेब्रुवारी १९४८ ला गांधी निधनानंतर 'हरिजन' पत्रही प्रकाशित होण्याचे बंद पडले.

गांधी साहित्यिक

उत्कट कथनेच्छा हा गांधीजींच्या गुजराती व इंग्रजी लेखनाचा प्रमुख हेतू असल्यामुळे त्यांचे लेखन अत्यंत प्रभावी, हृदयस्पर्शी आणि साहित्यगुणांनी युक्त ठरले आहे. साहित्यात भाषेची स्वाभाविकता व हृदयाचा प्रामाणिकपणा महत्त्वाचा असल्याचे त्यांनी बाराव्या गुजराती साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणात प्रतिपादन केले. 'सत्यना प्रयोगो' हे त्यांचे विश्वविख्यात आत्मचरित्र म्हणजे आत्मचरित्रलेखनाचा एक चांगला नमुना होय. ह्या आत्मचरित्राची आजवर अनेक देशी व विदेशी भाषात भाषांतरे झालेली आहेत. गुजराती गद्याला त्यामुळे नवे सामर्थ्य प्राप्त झाले. गुजराती भाषेचा पहिला प्रमाणभूत शब्दकोश ('जोडणीकोश') तयार करून त्यांनी अशुद्धलेखनाच्या अराजकतेपासून गजराती भाषेला वाचविले. इतकेच नव्हे, तर गुजराती भाषा-साहित्याचा दर्जा वाढविण्यासाठी त्यांनी अहमदाबाद येथे गुजरात राष्ट्रीय विद्यापीठाचीही स्थापना केली (१९२०). गांधीजींचा गुजराती भाषा-साहित्यावरील प्रभाव फार मोठा आहे आणि त्यामुळेच गुजराती साहित्याच्या इतिहासात 'गांधी युग' असा स्वतंत्र कालखंड मानला जातो. काकासाहेब कालेलकर, महादेवभाई देसाई, किशोरीलाल मश्रुवाला इत्यादी थोर साहित्यिक त्यांच्या प्रभावातूनच निर्माण झाले. गांधीजींनी जीवनाभिमुख साहित्याचा आणि मानवतावादी मूल्यांचा पुरस्कार केला. त्यांनी प्रभावित होऊन सुंदरम्,

अनुक्रमणिका

उमाशंकर जोशी, मेघाणी, धूमकेतू, रमणलाल देसाई इत्यादी साहित्यिकांनी कथा. काव्य, कादंबरी इत्यादी प्रकारांतील उत्तम साहित्यनिर्मिती करून ह्या मूल्यांचे संवर्धन केले.

नियतकालिकांतील गांधीजींचे वैचारिक लेखन प्रासंगिक असून ते धर्म, नीती, समाज, शिक्षण, राजकारण, अर्थशास्त्र, कला, आरोग्य इत्यादी विषयांवर आहे. त्यांचा पत्रव्यवहारही विस्तृत व विविध विषयस्पर्शी आहे. त्यांचे हे सर्व लेखन आणि पत्रव्यवहार 'मंगल प्रभात', 'धर्ममंथन', 'बापूना पत्रो' इत्यादी ग्रंथांतून संगृहीत आहे. त्यांच्या लेखांतील व पत्रांतील भाषा साधी, सरळ व स्वाभाविक आहे. सर्वसामान्य माणसालाही आपला आशय स्पष्ट व्हावयास हवा असा त्यांचा कटाक्ष व आग्रह असे.

त्यांचे महत्त्वाचे इतर ग्रंथ, 'नीतिनाशने मार्गे,' 'आरोग्य,' 'त्यागमूर्ति अने बीजा लेखो,' 'मूरखनो सरदार,' 'आखरी फेंसलो,' 'दक्षिण आफ्रिकाना सत्याग्रहनो इतिहास' (१९२२) हे होत.

## गांधीवाद

गांधीवाद म्हणून एक स्वतंत्र विचारपद्धती आहे. ही विचारपद्धती अध्यात्मवादावर आधारलेली आहे. किंबहुना तो विशिष्ट प्रकारचा अध्यात्मवाद आहे. गांधीवाद म्हणून काही नाही, ती एक जीवनपद्धती आहे असे अनेक गांधीवादी म्हणत असले, किंवा गांधींनीही तसे म्हटले असले, तरी गांधींनी विपुल लेखनामध्ये प्रतिपादिलेली ती एक स्वतंत्र विचारसरणी आहे, हे लक्षात आल्याशिवाय रहात नाही. तिचा प्रभावही आधुनिक जगाच्या सामाजिक व राजकीय विचारसरणींवर पडल्याशिवाय राहिलेला नाही.

> गांधी स्वतः मनाने पक्के हिंदू होते, तरी तत्त्वतः धर्मदृष्टच्या जगातील प्रसिद्ध धर्मांमध्ये मूलभूत ऐक्य आहे, अशी त्यांची श्रद्धा होती आणि जगातील सर्व धर्मांना व्यापणारे रहस्य आपणास प्राप्त झाले आहे, अशी त्यांची भावना होती.

सर्वच धर्मग्रंथांचे प्रामाण्य एका अर्थी त्यांनी मानले आहे. परंतु शब्दशः प्रामाण्य त्यांना मान्य नाही. त्यांच्यामते सर्वच धर्मग्रंथ मानवप्रणीत– ऋषि प्रेषित, संत– इत्यादिकांनी निर्मिलेले असल्यामुळे मानवाच्या स्वाभाविक मर्यादा व दोष धर्मग्रंथांमध्येही शिरलेले असतात. म्हणून गांधींनी धार्मिक ग्रंथांचे काही तात्त्विक निष्कर्ष काढले आहेत. ते काढीत असताना हिंदू धर्मातील विचारांची तात्त्विक पार्श्वभूमी त्यांनी स्पष्टपणे गृहीत धरली आहे. भारतातील

संन्यासवादाचे सार्वभौम नैतिक सिद्धांत, हा त्यांच्या नैतिक विचारसरणीचा गाभा आहे. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह हे पाच नैतिक नियम त्यांच्या विचारसरणीचा पाया आहेत आणि उपनिषदे व गीता यांमधील ईश्वरविषयक सिद्धांत या मूलभूत नैतिक नियमांचा आधार त्यांनी मानला आहे.

गांधीवाद हा धार्मिक मानवतावाद आहे. नीतिशास्त्र, समाजरचना व राजनीती यांस आधारभूत अशी नैतिक दृष्टी या मानवतावादामध्ये स्वीकारलेली दिसते. ईश्वरनिष्ठा ही मूलभूत आहे. ईश्वर म्हणजेच सत्य व सत्य म्हणजेच ईश्वर, असे गूढवादी समीकरण गांधींनी मांडले आहे. ईश्वर म्ह० ब्रह्म हेच सत्य, हा उपनिषदांचा व अद्वैत वेदांताचा सिद्धांत आहे. सृष्टीचे वैज्ञानिक पद्धतीने शोधलेले सत्य, असा या सत्याचा अर्थ नाही; उच्च नैतिक नियम असा या सत्याचा अर्थ दिसतो. म्हणून 'सत्याचे प्रयोग' या शब्दावलीने सूचित केलेली वैज्ञानिक पद्धती ही आलंकारिक अर्थानेच घ्यावयाची आहे.

या संदर्भात असा मुद्दा उपस्थित होतो की, सत्यसंशोधनास अंत नसतो; कारण माणसास सत्य पूर्णपणे सापडत नसते. सर्वज्ञ कोणी नसतो. म्हणून लोकशाहीत विचारस्वातंत्र्य व प्रचारस्वातंत्र्य हा मूलभूत मानवी हक्क मानला आहे. परंतु विचारांच्या प्रचारस्वातंत्र्याचा हा मूलभूत हक्क सत्यसंशोधनार्थ आवश्यक आहे. हा सिद्धांत गांधींनी कोठेही प्रतिपादिलेला आढळत नाही; याचे कारण असे दिसते की, गांधी बुद्धिवादापेक्षा 'आतल्या आवाजाला'च प्राधान्य देत होते.

गांधी म्हणतात की ईश्वर हा स्वतःसिद्ध, स्वयंप्रकाश व इंद्रियांच्या व बुद्धीच्या पलीकडचा असल्यामुळे, बुद्धिवादाच्या कसोट्या त्याला लागू पडत नाहीत. तो अनुभवसिद्ध आहे. हा अनुभव तपश्चर्येने व वैराग्याने ज्यांचे अंतःकरण शुद्ध झाले आहे, त्यांना म्हणजे तुलसीदास, चैतन्य, रामदास, तुकाराम यांच्यासारख्या भक्तांना येतो. ईश्वर हा सर्वांचा अंतरात्मा आहे. जीवात्मा त्याचाच अंश आहे. अहंकाराचा त्याग केला, स्वतःला शून्य केले की तोच रहातो. ईश्वर हाच सत्य असल्यामुळे अन्य जग मिथ्या आहे. सर्व प्राण्यांमध्ये एकच प्राण किंवा जीव आहे व तोच ईश्वर होय. विश्व ही त्याची लीला आहे. तो प्रकाश म्हणजे चैतन्य आहे व तोच अनंतानंद.

ईश्वर सत्य आहे म्हणजे काय, तर तो विश्वाच्या उत्पत्तिस्थिती-संहाराची नियामक शक्ती आहे; ही नियामक शक्ती ही नैतिक शक्ती आहे. आई, बाप, कन्या, पुत्र, बंधू, मित्र यांच्यातील प्रेम एकमेकांचे संरक्षण करते. कुटुंब, राष्ट्र, मानवजात, जीवसृष्टी व वस्तुमात्र यांना एकत्र करणारी शक्ती म्हणजे प्रेम

होय. परमेश्वर प्रेमरूप आहे. आस्तिक व नास्तिक हे सर्व सत्याचे उपासक बनतात, तेव्हा ते ईश्वरोपासकच बनतात. नास्तिक ईश्वर नाही, असे म्हणतो. परंतु सत्याचे परिपालन करतो, तेव्हा त्याला सत्याचेच आकर्षण असते, म्हणून तोसुद्धा एका अर्थी ईश्वराचे अस्तित्व मान्यच करतो. शत्रूवरही प्रेम केले, तर तो मित्र बनल्याशिवाय रहात नाही. कारण शत्रूच्या हृदयात परमेश्वराचा प्रकाश म्हणजे प्रेम आहेच. शत्रू जर मित्र बनला नाही, तर आपल्या तपश्चर्येत काहीतरी उणीव आहे असे मानावे. ईश्वराने जगात पापाला अवसर दिला आहे; त्यातून भक्तीने उत्तीर्ण होता येते. भक्ती व प्रार्थना खरी असली पाहिजे. भक्ती नैतिक शक्तीची भक्ती असते. प्रार्थना उत्कट असल्यास व चित्त शुद्ध असल्यास परमेश्वराचा म्हणजे अंतरात्म्याचा आवाज ऐकू येतो व तो सत्याचा मार्ग दाखवितो. गांधींनी याच दृष्टीने आत्मचरित्राला 'सत्याचे प्रयोग' असे नाव दिले आहे. ईश्वररूप सत्य गवसण्याकरिता फार मोठे प्रयत्न करावे लागतात; त्याकरिता इंद्रियसंयम करावा लागतो; अहिंसेची दीक्षा घ्यावी लागते. कारण अहिंसा हे सत्याचे साधन आहे. संपूर्ण अहिंसा ही सत्याच्याच कलदार नाण्याची दुसरी बाजू आहे. अहिंसा म्हणजे प्रेम होय.

अहिंसा हा आपल्या मानववंशाचा जीवनधर्म आहे. मानवसमाजाचे अस्तित्व अहिंसेवर आधारलेले आहे. शरीर व हिंसा यांचा नित्य संबंध आहे; हा एक बंध आहे; या बंधातून मुक्त होण्याचा मार्ग अहिंसा हा होय. शरीर असेपर्यंत कमीतकमी हिंसा म्हणजे अहिंसा असा अर्थ करावा लागतो. शरीरावर जितकी आसक्ती तितकी हिंसा अधिक. म्हणून शरीरावरची आसक्ती कमी केली पाहिजे. शरीरावरील आसक्ती कमी केल्याने म्हणजे तपश्चर्येने, संयमाने आत्मशक्ती वाढते, प्रकट होते. सर्वच प्राणिवर्ग अहिंस्य आहे. परंतु मानववंश श्रेष्ठ असल्यामुळे इतर प्राण्यांना वाचविण्याकरिता मानवाची हत्या होता कामा नये. मुंग्या, माकडे, कुत्री इत्यादी इतर प्राण्यांना अन्न देणे, हे युक्त नाही असे गांधी म्हणतात. परंतु याच्या उलटही त्यांची अनेक विधाने सापडतात. मांसाहार वर्ज्य करावा, हे हिंदू धर्मातील अहिंसेचे उत्कृष्ट प्रत्यंतर आहे, असे ते म्हणतात. गायीचा जीव वाचविण्याकरिता प्राणार्पण करणे, याचीही ते प्रशंसा करतात. "गाय दयेचे काव्य आहे. तिची मी पूजा करतो. हिंदू धर्मातील गोपूजा, वृक्षपूजा हे अहिंसेचेच प्रत्यंतर आहे" असे गांधी म्हणतात.

अहिंसेचा व सत्याचा हा सिद्धांत गांधींनी राजकीय व सामाजिक क्षेत्रात मोठ्या निष्ठेने आणला. त्याला ते सत्याग्रह असे म्हणतात. शुद्ध साध्याकरिता शुद्ध साधनेच उपयोगी पडतात; शुद्ध साध्याकरिता अशुद्ध साधने वापरल्यास

साध्यही अशुद्ध बनते ; साध्य दूर जाते; सत्याग्रहच शुद्ध साधन होय. सत्याग्रह म्हणजे सत्याकरता अहिंसेच्या मार्गाने असत्याचा प्रतिकार करणे. ज्या व्यक्तींच्या ठिकाणी नैतिक दृष्टया अयोग्य व गर्ह्य परिस्थितीचा प्रतिकार करण्याची शक्ती असते, म्हणजे आत्मशक्ती प्रकट झालेली असते, तेच सत्याग्रहाचे अधिकारी होत. त्यांची शरीरक्लेश सहन करण्याची शक्ती हा आत्मशक्तीचा एक भाग आहे. कित्येक वेळा शरीरक्लेश सहन करून प्रतिकार करणारा प्रतिपक्षावर जबरदस्तीही करू शकतो. त्याचा आग्रह अविवेकीही असू शकतो. त्यांची सत्याची कल्पना चुकीचीही असू शकते. त्यात असत्यही भरलेले असण्याची शक्यता असते. म्हणून खऱ्या सत्याग्रह्याला नैतिक दृष्टया अयोग्य काय व योग्य काय हा प्रश्न सोडविण्याची जबाबदारी पतकरावी लागते आणि आपल्या प्रतिकाराच्या उद्देशात असत्य दिसल्यास माघार घेण्याची तयारीही असावी लागते. माघार घेण्याकरितासुद्धा धैर्य लागते. निःशस्त्र प्रतिकारसुद्धा हिंसात्मक म्हणजे जबरदस्ती करणारा असतो. त्यात अत्याचारही असतो. सत्य हे तत्त्वतः शत्रूलाही मान्य असावे लागते. कारण विवेकबुद्धीची देणगी मानवाला प्राप्त झालेली आहे.

मनुष्य ही ईश्वराने घडविलेली स्वतःची प्रतिमा आहे, हे ख्रिश्चन तत्त्व गांधींनी मान्य केले आहे. जीवात्मा हा परमेश्वराचा अंश आहे, याची जाणीव अस्पष्टपणे माणसाला असतेच, असा हिंदू धर्माचा सिद्धांत आहे. हा सिद्धांत व ख्रिश्चन सिद्धांत याच्यामध्ये एक प्रकारची सुसंगती आहे. मानवांची सेवा हीच ईश्वराची पूजा होय, असाहि निष्कर्ष गांधींनी ख्रिस्ती धर्माच्या चिंतनातून काढला आहे.

युद्ध वा मानवी हिंसेचे अनेक कायदेशीर व बेकायदेशीर प्रकार अहिंसेच्या तत्त्वानुसारे बंद व्हावयास पाहिजेत, हे जरी खरे असले, तरी आजची जागतिक राजकीय परिस्थिती व सत्तेचे राजकारण लक्षात घेता, संरक्षण संस्था वा सैनिकशक्तीची संस्था ही आजतरी अपरिहार्य आहे, असे गांधींनी मान्य केले आहे. परंतु मानव हा बुद्धियुक्त प्राणी असल्यामुळे मानवामानवांमधील हिंसा बंद करणे हे मानवी कर्तव्य आहे, असे ते मानतात. अहिंसा हा ढोंगी दुर्बलाचा सिद्धांत नाही. ढोंगी, भित्रा मनुष्य व शस्त्राने प्रतिकार करणारा शूर मनुष्य यांच्यांत सशस्त्र शूर गांधींनी पसंत केला आहे. सबलाची अहिंसा हीच खरी अहिंसा होय असे त्यांनी वारंवार प्रतिपादिले आहे.

गांधींचा ब्रह्मचर्याचा सिद्धांत, हा अहिंसेचाच उपसिद्धांत आहे, इंद्रियांवर, संभोगावर विजय मिळविल्याशिवाय निःस्वार्थता प्राप्त होत नाही. निःस्वार्थता

अनुक्रमणिका

असेल, तरच अहिंसा साधते. स्त्री-पुरुषांचे मैथुन हे तत्त्वतः वर्ज्यच असले पाहिजे. प्रजोत्पादनाकरिता मैथुन आवश्यक आहे; परंतु तेही टाळणे शक्य असल्यास ते टाळावे. पुष्कळ वेळा पुरुषाने केलेला संभोग ही स्त्रीवर केलेली जबरदस्ती असते, अशी गांधींची समजूत आहे. याविरुद्धही गांधीजी एकेठिकाणी लिहितात की, 'स्त्री-पुरुषांचे लैंगिक आकर्षण हे महनीय आहे. संतती सृष्टीमध्ये सतत आवश्यक आहे, कारण परमेश्वराच्या लीलेचा तो भाग आहे. सृष्टी ही परमेश्वराची लीला आहे.' परंतु स्त्री-पुरुष संभोग ह्या अपवित्र क्रिया आहेत, अशाच प्रकारचा त्यांचा दृष्टिकोन आहे. त्यांची अशी चमत्कारिक समजूत दिसते की, स्त्री-पुरुष संभोगात मानवी सामर्थ्याचा अपव्यय होतो; मग तो संभोग विवाहित स्त्री-पुरुषांचा असो अथवा अविवाहितांचा असो. वैवाहिक संभोग ही पापावर घातलेली मर्यादा आहे. तेही पापच आहे. कारण त्याच्या योगाने मनुष्याचा शक्तिपात होतो. हा योगशास्त्रातील ब्रह्मचर्यविषयक सिद्धांत आहे. परंतु तो जीवविज्ञानाच्या दृष्टीने चुकीचा ठरलेला सिद्धांत आहे. कारण संभोगात होणारा वीर्यपात हा मर्यादित प्रमाणात होत असला, तर त्यामुळे शारीरिक किंवा मानसिक सामर्थ्य घटत नाही, उलट वाढते. गांधींचा याबद्दलचा दृष्टिकोन मानवी जीवविज्ञानदृष्ट्या नीट तपासला नाही: एवढे मात्र खरे की, वैवाहिक संबंधातून कुटुंबसंस्था निर्माण होते; त्यामुळे आप्तसंबंध तयार होतो व मर्यादित प्रेम उत्कट होते. सर्व मानवच आप्त आहेत, असा गांधींचा दृष्टिकोन आहे. नैसर्गिक आप्तसंबंधाने मर्यादित न होणारे प्रेम हे संन्यासाशिवाय कोणालाच शक्य नाही, म्हणून गांधी-सिद्धांत हा संन्याससिद्धांताचा एक उपसिद्धांत आहे, असे मानावे लागते. ब्रह्मचर्य हे ईश्वरप्राप्त्यर्थ आवश्यक आहे; हाही गांधींचा विचार ह्या संन्यासमार्गाचाच भाग आहे.

सत्य व अहिंसा या दोन नैतिक तत्त्वांवर आधारलेला रस्किनच्या पुस्तकावरून सुचलेला गांधींचा सर्वोदयवाद हे सामाजिक, राजकीय व आर्थिक तत्त्वज्ञान आहे. समाजाचा आध्यात्मिक विकासवाद गांधींनी मांडला आहे. म्हणजे वैयक्तिक प्रगतीप्रमाणे सामाजिक व राजकीय प्रगतीही होत असते, असे सर्वोदयवादात गृहीत धरले आहे. आर्थिक समता मानवी ऐक्याच्या तत्त्वावर विकसित करणे ही ऐतिहासिक प्रगतीची गरज आहे. सत्याग्रह हे त्याचे साधन आहे. दलित व पीडित वर्गाला समतेचा न्याय पहिल्यांदा मिळाला पाहिजे, याकरिता दलित व पीडित यांची सेवा केली पाहिजे व अन्यायाचा सत्याग्रहाच्याद्वारे प्रतिकार हा सतत चालला पाहिजे. विकास व क्रांतीचे प्रयत्न निसर्गाप्रमाणे समाजातही चालणार.

अनुक्रमणिका

भूकंप, वादळी उलथापालथ ही निसर्गात चालते, तशी समाजात ही चालणारच. प्रगतीला तिची कित्येक वेळा आवश्यकता असते. परंतु शांततापूर्ण मार्गाने सामाजिक विकास घडवून आणणे यावरच गांधींचा मुख्यतः भर आहे.

गांधी हे मूळचे वर्णाश्रमसंस्थेचे पुरस्कर्ते आहेत. त्यांनी जातिभेदाचेही समर्थन संयमाच्या तत्त्वानुसार केले आहे. स्वजातीमध्येच लग्न करणे व स्वजातीचेच अन्नग्रहण करणे यांत लैंगिक व रसनेचा संयम हे तत्त्व आहे, असे त्यांनी प्रतिपादिले आहे. परंतु १९३६–३७ च्या सुमारास गांधींनी वर्णाश्रमाचे आपले भाष्य बंद केले; साम्यवाद व समाजवाद यांचा नवीन पिढीमध्ये प्रसार होत आहे, हे पाहून त्यांनी अध्यात्मवादावर आधारलेल्या आर्थिक व सामाजिक समतावादाचा पुरस्कार सुरु केला. सामाजिक उच्चनीचभाव व हिंदूंची अस्पृश्यतेची संस्था हे सर्वोदयवादाशी विरुद्ध आहेत, म्हणून उच्चनीचभाव व अस्पृश्यता नष्ट करणे, ही गोष्ट सामाजिक प्रगतीची गरज आहे, असा विचार गांधींनी मांडला आहे.

## गांधींचे अर्थकारण :

म्हणजे विशिष्ट नैतिक ध्येयवादास अनुसरून आर्थिक व्यवहार कसे चालावेत यासंबंधी भारताच्या व जगाच्या आर्थिक व्यवस्थेबद्दलचे गांधींचे आर्थिक धोरण. अर्थशास्त्र हे आर्थिक व्यवहारांचे नियम सांगणारे शास्त्र होय. तसे अर्थशास्त्र गांधींनी किंवा गांधीवाद्यांनी सांगितलेले नाही. कार्ल मार्क्सच्या ऐतिहासिक भौतिकवादानुसार मानवी आर्थिक व्यवहारांचे ऐतिहासिक नियम आहेत. त्याप्रमाणे अपरिहार्य ऐतिहासिक परिणतीने साम्यवादाकडे जाणारे समाजवादी अर्थशास्त्र निष्पन्न होते. गांधी असा ऐतिहासिक परिणतिक्रम गृहीत धरून आपले अर्थशास्त्र सांगत नाहीत.

गांधींच्या आर्थिक धोरणाची मूलभूत तीन सूत्रे आहेत : १ ) न संपणाऱ्या नैसर्गिक संपत्तीवर अधिक भर असलेली अर्थव्यवस्था चिरंतन असू शकते; अशी अर्थव्यवस्था अंमलात आणली पाहिजे. निसर्गसंपत्तीचे दोन वर्ग; एक संपणारा म्हणजे सर्व खनिजे उदा. दगडी कोळसा, लोखंडादी धातू, खनिज तेले इत्यादी व दुसरा न संपणारा म्हणजे माती, दगड, लाकूड, वनस्पती, धान्ये, फळे, फुले, पाणी, प्रकाश, उष्णता, वायू, प्राणी, जनावरे इत्यादी. २ ) शरीरश्रमाचे महत्त्व असलेली अर्थव्यवस्था कार्यवाहीत आली पाहिजे. कर्मेंद्रियांनी, विशेषतः हातापायांनी, कामे करण्यानेच मानव चांगला सशक्त, शरीराने व मनाने निरोगी व दीर्घायुषी राहू शकतो. ३ ) ज्या अर्थव्यवस्थेत





श्रीमंत व गरीब हा भेद जाचक स्वरूपात राहील, अशी अर्थव्यवस्था असता कामा नये. तत्त्वत: संपत्तीवर खाजगी मालकी कोणाचीच नसावी. शरीरश्रम करील, त्यालाच संपत्तीचा उपभोग घेण्याचा नैतिकदृष्ट्या हक्क आहे. श्रीमंत व गरीब या दोघांनाही असा हक्क आहे. परंतु आर्थिक सुबत्ता निर्माण करण्याची बुद्धिमत्ता व कुशलता ज्या व्यक्तींच्या ठिकाणी वास करते, त्यांना औद्योगिक नेतृत्व लाभू शकते; त्यांना यासंबंधात संपूर्ण स्वातंत्र्य व अवसर मिळाला पाहिजे. हा औद्योगिक नेता मात्र मोठ्या संपत्तीचा विश्वस्त बनला पाहिजे. विश्वस्त म्हणून राहण्यास व स्वत:चा मालकी हक्क सोडण्यास तो नाराज असल्यास, कायद्याने व लोकशाही पद्धतीने मालक वर्गाचा मालकी हक्क रद्द केला पाहिजे.

एकोणिसाव्या शतकातील यूरोपीय किंवा पश्चिमी क्रांतीत उत्पन्न झालेल्या सामाजिक अनिष्टांची प्रतिक्रिया म्हणून गांधींनी आपले निराळे आर्थिक धोरण, ती अनिष्टे टाळण्याकरिता प्रतिपादिले. औद्योगिक क्रांतीने शहरांची राक्षसी वाढ झाली, ग्रामीण जीवन विस्कळित झाले, रेल्वे वगैरे वेगवान साधनांनी रोगांचा फैलाव होऊ लागला, हस्तव्यवसाय बुडले, बेकारांची संख्या अनावरपणे वाढू लागली आणि भांडवलदारवर्ग मजुरांची पिळवणूक अधिकाधिक करू लागला; त्यामुळे श्रीमंत व गरीब हा भेद अत्यंत तीव्र झाला. हस्तव्यवसाय सुटल्यामुळे माणसांचे आरोग्य बिघडू लागले. माणसांना आधि-भौतिक भोग हेच मुख्य श्रेय वाटू लागले व समाधानी वृत्ती नष्ट होऊन माणूस यंत्रांचा दास झाला. औद्योगिक क्रांती झालेली राष्ट्रे मागासलेल्या राष्ट्रांवर साम्राज्य पसरवू लागली आणि मागासलेल्या राष्ट्रांची आर्थिक व सांस्कृतिक दुरवस्था वाढली, याची तीव्र जाणीव होऊन गांधींनी नवे आर्थिक धोरण सांगितले.

निसर्गातील जी संपत्ती माणसाला निरंतर प्रयत्न करून निरंतन कालपर्यंत लाभेल, तिच्याच आधारावर उद्योग चालविले पाहिजेत. खनिज संपत्तीवर आधारलेले आधुनिक यांत्रिक उद्योग हे दुय्यम म्हणून अपरिहार्य असतील, तेवढेच चालविणे हितावह होईल. परंतु मनुष्याच्या शरीरश्रमाची गरज संपली आहे, अशी परिस्थिती निर्माण होता कामा नये. ग्रामसंस्था कायम टिकेल व शहरे वाढणार नाहीत अशी अर्थ-अवस्था पाहिजे; ती कुटिरोद्योगांवरच टिकू शकेल. औद्योगिक क्रांतीमुळे शहरांची भरमसाट वाढ होत आहे, ती थांबली पाहिजे. आधुनिक वैज्ञानिक शोधांवर आधारलेली आर्थिक क्रांती ही जगातील

अनुक्रमणिका

संपन्न राष्ट्रांची युद्धखोरी वाढवीत आहे. जगातील राष्ट्राराष्ट्रांमध्ये शांततेचे संबंध निर्माण करण्यास ही परिस्थिती प्रतिकूल आहे.

आजचे स्वतंत्र भारताचे अर्थकारण हे या गांधीवादी अर्थकारणापासून दूर गेले आहे. ते ग्रामराज्य स्थापण्यास अनुकूल नाही. पश्चिमी समाजवादी व समाजवादी नसलेली राष्ट्रे ज्या प्रकारची अर्थव्यवस्था वाढवीत आहेत व दृढ करीत आहेत, त्याच प्रकारच्या अर्थव्यवस्थेचा पाया स्वतंत्र भारतातही निर्माण होत आहे.

◆ ◆ ◆ ◆

---







डॉ. कु. उषा वि. करंबेळकर

# पुराणातील सुपरिचित पण गूढ व्यक्ती

# शीघ्रकोपी दुर्वास : ३ :

अयाचितः सुखं दत्ते याचितश्च न यच्छति ।
सर्वस्वं चापि हरते विधिरुच्छृंखलो नृणाम् ।।

## प्रास्ताविक

पुराणवाङ्मयातील अनेक व्यक्ति सामान्य लोकांनाही परिचित असतात. उदा० राम, हनुमान्, रावण, धर्म, भीम इत्यादि. कारण त्यांच्या व्यक्तिमत्त्वात गूढपणा नाही. परंतु सर्वच पौराणिक व्यक्ती इतक्या उघड स्वरूपाच्या नसतात हे आपण नारद व अहल्या याच्या उदाहरणावरून पाहिले. अशीच दुर्वास (दुर्वासस्) ही व्यक्ति आहे. दुर्वास नाव उच्चारताच आपल्या डोळ्यापुढे आश्रमात चिन्ताक्रान्त व विमनस्क शकुन्तलेला 'विचिन्तयन्ती यमनन्यमानसा ... ... इत्यादि शाप देणाऱ्या ऋषीची उग्रमूर्ति उभी राहते. त्यामुळेच बहुधा उगाच कोणावर आग पाखडणाऱ्या व्यक्तीला 'दुर्वास' म्हणण्यात येते. दुर्वास ऋषी अतिशय रागीट व उग्र स्वरूपाचा ऋषि होता.

पुराणात त्याच्यासंबंधी अनेक कथा येतात. त्यावरून आपणास या ऋषि-बद्दल बरीच माहिती मिळते व त्याच्या स्वभावाविषयी कुतूहल वाटू लागते. दुर्वास ऋषि मुळात कोण असावा? त्याचे कोणाकडे अचानक येणे, त्याचे क्षणात रागावणे व शाप देत सुटणे, क्षणात प्रसन्न होणे इ. गोष्टी थोड्याशा विलक्षण वाटतात. म्हणून दुर्वासाचे चरित्र जवळून पाहण्याची जिज्ञासा होते.

## जन्म

दुर्वास ऋषीच्या जन्माविषयी पुराणात एकमत नाही. कोठे तो ब्रह्मदेवाचा एक मानसपुत्र होता असे तर कोठे तो आत्रेय म्हणजे अत्रि ऋषीचा पुत्र म्हटला आहे. हा अत्रि म्हणजेच एक प्रजापति (प्रभाकर) होता. (म्हणजे दुसऱ्या

अनुक्रमणिका

शब्दात पहिलेच मत. ) दत्त आत्रेय हा सत्ययुगात झाला. हे हैहय कार्तवीर्याने दत्ताची आराधना केली यावरून सिद्ध होते. अत्रि ऋषिच्या तीन पुत्रापैकी दुर्वास शंकराचा अवतार होता.

" दुर्वासाः शंकरो जज्ञे " ... ... मार्क. १७.११.

" दुर्वासाः शंकरस्यांशः चचार पृथिवीमिमाम् ॥ "

( विष्णु. १.९.१ )

जन्मतःच हा मुलगा मातापितरांचा त्याग करून 'उन्मत्त' नामक व्रत धारण करून त्रिभुवनात हिंडत राहिला. त्रिपुरनाशासाठी शंकराने सोडलेला बाण लक्ष्याचा नाश करून बालक बनला. तोच दुर्वास ( महाभा. अनु. १६०.३६-३७ ) असेही एका ठिकाणी म्हटले आहे. याप्रमाणे सत्ययुगापासून दुर्वासाच्या कथा चालत आल्या आहेत व त्याच्या जन्माबद्दल पुराणात एकमत नाही. जरी अन्यत्र दुर्वास दर्शनीय, तेजस्वी, मधुरवाक्, सुमहातपाः, धीमान् असे वर्णन आढळते तरी त्याचे खरे स्वरूप श्रीकृष्णाने वर्णिले आहे ते असे--

अवसन्मद्गृहे तात ब्राह्मणो हरिपिङ्गलः ।
चीरवासा बिल्वदण्डी दीर्घश्मश्रुः कृशो महान् ॥
दीर्घेभ्यश्च मनुष्येभ्यः प्रमाणादधिको भुवि ।
स स्वैरं चरते लोकान् ये दिव्या ये च मानुषाः ॥
रोषणः सर्वभूतानां सूक्ष्मेप्यपकृते कृते ।
स भुङ्क्ते सहस्राणां बहूनामन्नमेकदा ॥
एकदा सोल्पकं भुङ्क्ते ... ... ...
अकस्माच्च प्रहसति तथाकस्मात्प्ररोदिति ।
न चास्य वयसा तुल्यः पृथिव्यामभवत्तदा ॥ (महाभा. अनु. १५९)

तो ब्राह्मण पिंगट वर्णाचा, फाटकी वस्त्रे धारण करणारा, बेलाचा दण्ड हाती घेतलेला, भरपूर दाढीमिशांचा, कृश, प्रमाणाहून अधिक उंच, त्रिभुवनात संचार करणारा, थोडे मनाविरुद्ध होताच संतापून शाप देण्यास प्रवृत्त होणारा, कधी भरमसाट खाणारा, तर कधी अल्पाने संतुष्ट होणारा, उगाच हसणारा, व रडणारा आणि किती वयाचा आहे हे कोणास ठाऊक नसणारा आहे. म्हणजे त्याचा वेष व आचरण, त्याने घेतलेल्या 'उन्मत्त' व्रताला साजेचे होते. कठोर व्रताचे पालन करणारा व धर्माच्या बाबतीत आपला निश्चय अगदी गुप्त ठेवणारा हा उग्रमहर्षि होता. शीघ्र रागावणे व लगेच शाप देणे हा त्याचा विशेष म्हणून--





" यस्य संजातकोपस्य भयमेति चराचरम् ।

( विष्णु १,९.१७ )

याच्या रागाला देवादि सर्व विश्व भिते असे म्हटले आहे. दुर्वासाचा स्वभाव असा अनिश्चित– कधी रागावेल हे साँगता येत नाही म्हणून तो समोर येताच ' आगामी संकटाची सूचना'च वाटते.

## त्रिकालात व त्रिलोकात संचार

चिरंजीवांच्या यादीत दुर्वासाचे नाव नाही पण तो चिरंजीवच म्हटला पाहिजे. त्याच्या विषयीच्या कथा सत्य, त्रेता व द्वापरयुगातील आहेत. तसाच तो ब्रह्मदेवाच्या सभेत असतो. ( महाभा सभा ११.२३ ) व इंद्राच्या सभेत असतो. ( महाभा. सभा. ७.११ ) पृथ्वीतलावरील राजेलोकांच्या सभेत त्याचे आगमन होते व पाताळातही तो जातो. असा हा ऋषि जो तीन्ही काळात व तीन्ही लोकात ज्याच्या समोर जाईल त्यावर संकट आणतो तो आहे तरी कोण ? हे जाणण्यासाठी हा प्रयत्न आहे.

दुर्वास हा सामवेदी आचार्य होता. कारण जैमिनीय गृह्यसूत्रात उपाकर्मांगभूत तर्पणात त्याचा उल्लेख येतो. ह्याने शंकराच्या आदेशावरून राजा श्वेतकीच्या शतवर्षीय यज्ञाचे संपादन केले. हा पौराणिक दुर्वासाहून वेगळा कोणीतरी ऋषि असावा. त्याचप्रमाणे आर्याद्विशति, देवीमहिम्नस्तोत्र, पराशिवमहिम्नस्तोत्र, ललितास्तवरत्न इ. ग्रंथांचा कर्ता म्हणून जो दुर्वास आहे तो उघड उघड अगदी अलीकडचा वाटतो हे ग्रंथांच्या नावावरूनच ठरते.

गंधमादनावर दुर्वास तपश्चर्या करीत असता तेथे त्याला बलिपुत्र साहसिक व तिलोत्तमा यांचा शृंगार पाहून विवाह करण्याची इच्छा झाली. तेव्हा और्वमार्गवाने आपली कन्या कंदली त्यास अर्पण केली. ( ब्रह्मवै. श्रीकृष्णजन्मखण्ड अ. २४ ) कंदली स्वतःच कर्कशा होती. पतीचे शंभर अपमान करण्याबद्दल तिला त्याने जाळून भस्म केले.

## सत्ययुगात

दत्त आणि दुर्वास हे दोघे पुराणप्रसिद्ध आत्रेय ऋषि होते. ऐतिहासिक परंपरेने दत्तात्रेयाचा संबंध हैहय नृपवंशाशी जोडलेला आहे. हैहय वंशाच्या अर्जुन कार्तवीर्याने दत्तात्रेयाची उपासना करून कृपा संपादन केली. ( महाभा. वन ११५; ब्रह्मांड–३.६९ ) दत्तात्रेय विष्णूचा चौथा अवतार मानला जातो. दुर्वास आत्रेय हा दत्तात्रेयाचा भाऊ (ब्रह्माण्ड ११७.२) परंतु त्याचा कोणत्याही नृपवंशाशी नियत संबंध इतिहासात उपलब्ध नाही. हैहय वंश सत्ययुगात होऊन

गेला. भार्गव परशुरामाने सत्य युगाच्या शेवटी हैहयांच्या नाश केला. अथर्ववेदात यासंबंधी उल्लेख आहे. उरलेल्या हैहयांचा वंश अयोध्येच्या इक्ष्वाकु वंशातील बाहु राजाने संपविला. बाहु सत्ययुगातला शेवटचा राजा होता. यावरून दुर्वास सत्ययुगातील ऋषि होता असे स्पष्ट दिसते. दुर्वासाने महर्षि मुद्गलाच्या दानशूरतेची ६ वेळा परीक्षा घेतली असे महाभारतात येते. ( वन. २६०. ) हा मुद्गल उत्तर पञ्चाल राजवंशाचा राजा होता. याच्या पित्याचे नाव भृम्यश्व असे होते. याच वंशात नंतर झालेल्या वध्र्यश्व, दिवोदास, सुदास् वगैरे राजांचे ऋग्वेदात उल्लेख येतात. याप्रमाणे मुद्गलही सत्ययुगात होऊन गेला असे ठरते. असाच दत्तभक्त नृप अलर्क सत्ययुग संपून गेल्यावर काशी राजवंशात झाला.

### त्रेता युगात

दुर्वासाचा अंबरीष ( भागवत ९.४.३५-७१ ) राम ( वा. रा. उ. १०५; पद्म उ. २७१ ) या त्रेता युगातील राजाशी संबंध आला. अम्बरीष नाभागि व राम दाशरथी दोघेही चक्रवर्ती राजे होते. ( षोडश राजिक महा. ७.५५; १२.२९ ); दोघेही अयोध्येच्या इक्ष्वाकु वंशातील होते. अम्बरीष हा भगीरथानंतर झालेला तिसरा राजा व सगरानंतरचा साहवा. बाहूचा पुत्र सगर गादीवर असताना त्रेतायुग सुरू झाले: व राम दाशरथीने त्रेतायुगाच्या शेवटी राक्षसांचा नि:पात केला. म्हणजे या दोन राजात कित्येक शतके गेलेली असणार. तथापि या दोन्ही राजांना दुर्वासाचा प्रत्यक्ष प्रभाव जाणवला.

दुर्वासाने शकुन्तलेला शाप दिला असे कालिदास सांगतो. शकुन्तला ही पौरव नृप दुष्यन्ताची राणी होती. दुष्यन्त त्रेता युगाच्या आरंभी होऊन गेला.

### द्वापर युगात

महाभारतात दुर्वासासंबंधी अनेक कथा येतात. त्यात कुन्तिभोज राजाकडे आगमन व कुन्तीकडून सेवा ( वन. ३०३;३०५ ); दुर्योधनाला वरदान ( वन. २६२ ); पाण्डवांची सत्त्वपरीक्षा ( वन. २६३ ); श्रीकृष्णाकडून आराधना ( द्रोण. ११; अनु. १५९ ) हे सर्व प्रसंग द्वापर युगात घडले. भारतीय युद्ध संपले आणि लगेच द्वापरयुग संपले.

याप्रमाणे हा ऋषि तीन्ही काळात व तीन्ही लोकात वावरतो असे दिसते. व त्याला कोठे चिरंजीवही म्हटलेले नाही !

### शीघ्रकोपी स्वभाव

दुर्वासाचा स्वभाव अत्यन्त कोपाविष्ट होता हे सर्वच कथात येते. अम्बरीषाच्या एकनिष्ठ उपासनेने भगवान् विष्णु त्याला प्रसन्न झाले होते व जणु

त्यावर पुढे दुर्वासाचे संकट येणार या भविष्याच्या जाणिवेने भगवन्ताने त्याच्या संरक्षणासाठी सुदर्शन चक्राची योजना केली होती. मग अम्बरीषाने एक वर्ष एकादशी व्रत केले व ते संपूर्ण झाल्यावर ब्राह्मणभोजन घालून तो स्वतः व्रताचे पारणे करणार इतक्यात दुर्वास तेथे आला. राजाने त्याचे स्वागत केले व भोजनाचे निमंत्रण दिले. दुर्वास स्वतःच्या आह्निकासाठी नदीवर गेला. इकडे पारण्याची वेळ संपत आली कारण द्वादशी संपण्यास एक घटका उरली म्हणून ब्राह्मणांच्या साह्याने राजाने जलपान करून पारणे पार पाडले. दुर्वास काही वेळाने परत आला. व राजाच्या मुखाकडे पाहून याने पारणे सोडले हे त्याने जाणले. आणि त्याला क्रोध आला. त्याने एक जटा उपटली व त्यापासून एक कृत्या उत्पन्न झाली. ती तरवार घेऊन राजाचा वध करण्यास धावली. राजा जागचा हलला नाही. सुदर्शनाने कृत्येला नष्ट केले व ते दुर्वासाच्या मागे लागले. तीन्ही लोकात व त्रिमूर्तींना शरण जाऊन देखील दुर्वासाला चक्रापासून अभय मिळाले नाही.

दुर्वासाच्या प्रत्येक कथेत असाच त्याचा एकदम रागावण्याचा स्वभाव दिसतो. एकदा रम्भेसह क्रीडा करणाऱ्या इन्द्राला त्याची नम्रता पाहून दुर्वासाने पारिजाताचे फूल दिले. ते त्याने ऐरावताच्या मस्तकावर ठेवले असता खाली पडून हत्तीच्या पायाखाली चिरडले गेले. त्यामुळे संतप्त दुर्वासाने "तस्मात्प्रनष्ट-लक्ष्मीकं त्रैलोक्यं ते भविष्यति।" असा शाप दिला. ( ब्र. वै. प्रकृति. ३६ ) पारिजातकाचे फूल ऐरावताच्या पायाखाली गेले म्हणून इन्द्रावर रागावला; बलिपुत्र साहसिकाच्या गंधमादनावरील क्रीडेमुळे त्याच्यावर रागावला; इ. असा आपला स्वभाव असल्याचे दुर्वास स्वतःच सांगतो.

नाहं कृपालुहृदयो न च मां भजते क्षमा।
अक्षान्तिसारसर्वस्वं दुर्वाससमवेहि माम्॥
चलज्जटाकलापस्य भ्रुकुटीकुटिलं मुखम्।
निरीक्ष्य कस्त्रिभुवने मम यो न भयं गतः॥ ( विष्णु. १.९.२२.२३ )

तऱ्हेवाईक

दुर्वासाचा तऱ्हेवाईकपणा प्रत्येक कथेत आढळतो. 'अकस्माच्च प्रहसति तथाकस्मात्प्ररोदिति।' केव्हा तरी हसणे, केव्हा तरी रडणे; हजारो लोकांचे अन्न खाणे नाहीतर थोडे खाऊन तृप्त होणे; फाटकी वस्त्रे धारण करणे, मनास येईल तिकडे भटकणे, अनेक शिष्य घेऊन फिरणे व विशेषतः दुसऱ्याला शाप देणे म्हणजे दुःख देणे या सर्व गोष्टी दुर्वासाचा तऱ्हेवाईकपणा दाखविणाऱ्या आहेत. महाभारताच्या अनु. १५९ अध्यायात श्रीकृष्णाने दुर्वासाची सेवा केली

असे वर्णन आहे. त्यावरून दुर्वासाचा तऱ्हेवाईकपणा स्पष्ट होतो. हेच त्याचे 'उन्मत्त' नावाचे व्रत असावे.

"दुर्वासाला कोण आपल्या घरी ठेवील ? जो मला आश्रय देईल त्याने मला राग येऊ देऊ नये" असे म्हणत दुर्वास पृथ्वीवर भ्रमण करीत असता कोणी लक्ष दिले नाही. म्हणून श्रीकृष्णाने त्याला आपल्या घरी ठेवून घेतले. तेथे दुर्वासाने सर्व प्रकारचा तऱ्हेवाईकपणा आरंभला. कधी खूप खावे कधी काही खाऊच नये; कधी हसावे: कधी रडावे; कधी कुठे बाहेर गेले की लवकर परत येऊ नये; एकदा तर त्याने घरातल्या सर्व वस्तु जाळून टाकल्या; एकदा सर्व प्रकारचे अन्न तयार ठेवण्यास सांगून अगदी वेळेवर खीर पाहिजे असा हट्ट धरला. अतिशय कढत खीर पिऊन उरलेली त्याने श्रीकृष्णाला आपल्या अंगास लावण्यास सांगितले. नंतर त्याने रुक्मिणीस तसेच करण्यास सांगितले. नंतर त्याने तिला रथाला जोडले व त्या रथात तो बसला. नंतर त्याने रुक्मिणीस अंकुशाने प्रहार केला. ती वाटेत अडखळताच तिला चाबकाने मारले. नंतर रथातून खाली उतरून तो पायीच पळू लागला. श्रीकृष्णाने त्याच्या मागे जाऊन त्याला विनवून परत आणले. श्रीकृष्णाने आपला राग जिंकला हे पाहून दुर्वास संतुष्ट झाला; व त्याने त्याला– "लोकात तुझ्यासंबंधी प्रीति राहील, पुण्यवान् लोक आहेत तोपर्यंत तुझी कीर्ति राहील, जेथे जेथे तुझ्या अंगाला खीर लागली आहे त्या त्या अंगाला जरामृत्यूचे भय नाही." व रुक्मिणीलाही असेच वर दिले.

## वरदान आणि शाप

दुर्वास येणे म्हणजे वरदान किंवा शाप प्राप्त होण्याची वेळ. जेव्हा काही संकट येणार असेल किंवा लाभ होणार असेल तेव्हाच दुर्वासाचे आगमन होते. अम्बरीषावर कृत्या धावून येणार होती; अप्सरा वपूला शाप मिळणार होता. ( मार्कण्डेय अ. १ ) श्रीकृष्ण व रुक्मिणीस कष्ट व वरदान मिळणार होते. कुन्तीला पुत्रप्राप्तीचे मंत्ररूप वरदान मिळणार होते; असेच दुर्योधनाला; द्रौपदीची सत्त्वपरीक्षा होणार होती; इन्द्र, बलिपुत्र, शकुन्तला यांना शाप मिळणार होते. म्हणजे जेथे दुर्वास जाईल तेथे शाप व वर आलेच आणि ते देखील अनपेक्षितपणे; अकस्मात्. दुर्वास स्वतःच म्हणतो–

अभिशापो प्रसादो वा भवेद्दैवेन दानव ।
सत्कीर्तिरपकीर्तिर्वा प्राक्तनः प्रभवा ध्रुवम् ।।

( ब्रह्मवैवर्त श्रीकृष्णजन्म अ. २३. १४३ )

अनुक्रमणिका

– म्हणजे स्वतः शाप वा वरदान देऊन ते प्राक्तनामुळे प्राप्त होतात असे म्हणण्याने आपण स्वतःच प्राक्तन (दैव, प्रारब्ध) आहोत असे ऋषि मान्य करतो.

## रामाची कथा

असा दुर्वास कोण असेल याचे रहस्य रामाकडे दुर्वास आले तेव्हा लक्षात येते. (वा. रा. ३.१०५: पद्म पु. उ. २७१) ती कथा अशी– 'एकदा तापसाचे रूप घेऊन काल रामाकडे आला. "ब्रह्मदेवाचा दूत मी रामाकडे कामानिमित्त आलो आहे" असा निरोप त्याने लक्ष्मणाकडून रामाकडे पाठविला. रामाने तापसाचा सत्कार केला. व त्याला ब्रह्मदेवाचा संदेश काय आहे तो विचारला. तापसाने रामास एकान्तात नेले व नेताना अशी अट घातली की जो कोणी त्या एकान्ताचा भंग करील त्याला मृत्युदण्ड मिळावा. रामाने अट मान्य केली व लक्ष्मणाला दरवाज्यात बसवून ठेवले. इकडे राम तापसरूप कालाचा संदेश ऐकत असतानाच दुर्वास रामचंद्राच्या दर्शनास आला. लक्ष्मणाने त्यास क्षणभर थांबण्याची विनंति केली. लगेच त्या शीघ्रकोपी ऋषीला क्रोध आला. तो लक्ष्मणाला म्हणाला– "जर तू माझी आता रामाशी भेट होऊ दिली नाहीस तर मी तुला, रामाला, भरताला, शत्रुघ्नाला व तुमच्या संतानाला, साऱ्या नगराला व देशाला शाप देईन." लक्ष्मणाने अनेकांचा नाश होण्यापेक्षा स्वतःचा एकट्याचा मृत्यु बरा, असा विचार करून रामाला तो दुर्वासाचा निरोप सांगितला– "सहस्र-वर्षांच्या माझ्या तपाची आज समाप्ति आहे. त्याला योग्य भोजन मला दे." दुर्वास भोजन करून संतुष्ट झाला; व निघून गेला. कालाला दिलेल्या वचनाची आठवण होऊन राम खिन्न झाले. तेव्हा लक्ष्मणाने रामास 'दुःख करू नका' असे सांगताना

"पूर्वनिर्माणबद्धा हि कालस्य गतिरीदृशी"

– अशी समजूत घातली. पुढे रामाची आज्ञा घेऊन लक्ष्मणाने शरयू नदीत प्रवेश केला.

## दुर्वास–दुर्दैव

लक्ष्मणाचे वरील वचनच दुर्वासाचे स्वरूप स्पष्ट करते. तो म्हणतो मला जो मृत्यु आला तो पूर्वनिर्माण=दैव=प्रारब्ध–यामुळे आला. हे लक्ष्मणाचे शब्द दुर्वास म्हणजे दैव अथवा अधिक स्पष्ट शब्दात "दुर्दैव"च होय असे ठरवितात. दुर्वास म्हणजे दुर्दैव किंवा फलोन्मुख दुष्ट प्रारब्ध असे लक्षात येण्यास वेळ लागत नाही. त्यामुळे दुर्वासाविषयीचे सर्व प्रश्न सुटतात. त्याचे

आकस्मिक येणे; त्याचा तऱ्हेवाईक स्वभाव; त्याचे विचित्र स्वरूप, त्याचे चिरंजीवित्व, त्याचे त्रिकालव्यापित्व व त्याची श्रीकृष्ण राम वगैरे सारख्यांनाही त्रास देण्याची शक्ति इ. सर्व गोष्टींचा एकदम उलगडा होतो. दुर्दैव नेहमी आकस्मिकपणे घाला घालते. तसाच दुर्वास त्याच्याविषयीच्या प्रत्येक कथेत अचानक उपस्थित झालेला आहे. दैवाचे खेळ विचित्र असतात असे म्हणतात. कोणावर केव्हा काय प्रसंग येईल याचा नेम नसतो. दुर्वासाचे वागणेही असेच होते. त्याने श्रीकृष्णाला उष्टी खीर अंगास लावण्यास सांगितले, रुक्मिणीला रथास जोडले, कुन्तीकडून सेवा घेताना सकाळी येतो म्हणून सांगून सायंकाळी येणे, वाटेल तो पदार्थ खावयास मागणे. कधी खूप खाणे तर कधी उपाशी राहणे असे अनपेक्षित वागणे दैवाचे दुर्विलास असतात त्याचा पिंगट रंग, फाटके कपडे, कृश शरीर, अतिक्रोधी स्वभाव सर्वच दुर्दैवाच्या स्वरूपाशी जुळणारे आहेत. या प्रमाणे पुराणांनी दुर्दैव दुर्वासाच्या रूपाने साकार बनविलेले आढळते. दुर्वासस् शब्दाची व्युत्पत्ति ' घाणेरडे वस्त्र धारण करणारा ' या कल्पनेला जुळणारी आहे. दुर्वासाला सारे विश्व भीत असे. कारण दुर्दैवाला कोण भिणार नाही !

वैदिक काळापासून अमूर्त कल्पनांना मूर्त स्वरूप देण्याकडे प्राचीनऋषींचा कल आहे. इन्द्रादि देवता निसर्गशक्ति होत्या त्यांना आकारवती देवता बनविल्या. श्रद्धा, मन्यु वगैरे कल्पनांना मूर्तस्वरूप दिले. मन्यु ही तर एक भावना आहे पण तिचीही देवता बनविली. त्याच पद्धतीने दुर्दैवाच्या कल्पनेला दुर्वासरूपाने मूर्त स्वरूप दिलेले दिसते.

दुर्वासाबरोबर अनेक शिष्य असत असे वर्णन कथातून येते. शिष्य गुरू-मागून जातात, गुरूजवळ असतात जसे दुर्दैवाबरोबर येणारे अनेक परिणाम मनुष्याला भोगावे लागतात. त्याचप्रमाणे दुर्वासाच्या प्रत्येक कथेत त्याने 'भोजन' मागितले आहे. हाही मुद्दा लक्षात ठेवण्यासारखा आहे. भुज् धातू खाणे (भुङ्क्ते) व भोगणे ( भुनक्ति ) अशा दोन्ही अर्थात आहे. त्यामुळे दुर्वासाचे खाणे तो ज्याकडे जात असे त्याच्या दुर्दैव भोगाचे उपलक्षण ठरू शकेल.

आणखी एक मुद्दा वरील समीकरणाचा पोषक असलेला आढळतो दुर्वासाने श्रीकृष्णाला आपली उष्टी खीर अंगास लावण्यास सांगितली ( महा भा अ. १५९ ).

" क्षिप्रमङ्गानि लिम्पस्व पायसेनेति स स्म ह " । २५.

व श्रीकृष्णाने तसे केले. फक्त आपल्या पायाच्या तळव्यांना खीर लावली नाही. ऋषीने ते जाणले व म्हटले--

" यावदेतत्प्रलिप्तं ते गात्रेषु मधुसूदन ।
अतो मृत्युभयं नास्ति यावदिच्छासि चाच्युत ॥ ४३
न तु पादतले लिप्ते कस्मात्ते पुत्रकाद्य वै ।
नैतन्मे प्रियमित्येवं ... ....... ... ...

व –

स केशवं योगयुक्तं शयानं
मृगासक्तो लुब्धकः सायकेन ।
जराऽ विध्यत्पादतले. त्वरावान्

( मौसल. ४.२२–२३ )

व व्याधाच्या बाणाने पायाचा तळवा जखमी झाल्याने श्रीकृष्णाने आपला अवतार संपविला येथे दुर्वासाचे दुर्दैवरूप सौम्यपणे दर्शविले आहे.

हरिभक्तिपुढे माघार–

दुर्वास अन्यथा कितीही उग्र असला तरी तो हरिभक्तिपुढे माघारच घेतो. हरिभक्तापुढे दुर्दैवाचा प्रताप चालत नाही. अम्बरीषाच्या कथेवरून हे स्पष्ट होते. सुदर्शनचक्राच्या भयाने दुर्वास जेव्हा विष्णुपुढे आश्रय मागण्यास गेला तेव्हा मी भक्तांच्या स्वाधीन आहे मला काही करता येणार नाही. तू अम्बरीषाकडे जा व त्याची क्षमा माग असे विष्णूने त्याला उत्तर दिले. दुर्वासाने अंबरीषाची क्षमा मागून सुदर्शनाचा त्रास चुकविला; व शेवटी अशी कबुली दिली–

अहो अनन्तदासानां महत्त्वं दृष्टमद्य मे ।
कृतागसोऽपि यद्राजन्मङ्गलानि समीहसे ॥
दुष्करः को नु साधूनां दुस्त्यजो वा महात्मनाम् ।
यैः संगृहीतो भगवान् सात्वतामृषभो हरिः ॥
राजन्ननुगृहीतोऽहं त्वयातिकरुणात्मना ।
मदघं पृष्ठतः कृत्वा प्राणा यन्मेऽभिरक्षिताः ॥
प्रीतोस्म्यनुगृहीतोऽस्मि तव भागवतस्य वै ।

( भागवत. ९.५–१४–२० )

दुर्दैव भगवद्भक्तिपुढे बोथट ठरते.

असेच पांडवांचे सत्त्व हरण करणाऱ्या दुर्वासाचा पूर्ण पराभव झाला. ( महाभा. वन. २६२, ६३, ६४ )– दुर्योधनाच्या सांगण्यावरून दुर्वास शिष्यासह अरण्यात पाण्डवाकडे गेला व दुपारची वेळ टळून गेल्यावर ' भोजन द्या '

अनुक्रमणिका

अशी त्याने मागणी केली. धर्मराजाने धीर धरून ऋषींना स्नान करून या असे सांगितले. इकडे द्रौपदीने कृष्णाची प्रार्थना केली. द्रौपदीच्या हाकेसरशी कृष्ण धावून व तिच्याकडून थाळी घेऊन तीत चिकटलेले एक पान त्याने खाल्ले व तृप्त झालो असे म्हटले. इकडे नदीजलात स्नानासाठी उतरलेले ऋषि सशिष्य बाहेर येतात तो काय चमत्कार ! त्यांना आकण्ठ भोजन झाल्याची तृप्ति मिळाली. सर्वाभूती असलेला परमात्मा तृप्त झाल्यावर मुनींना भोजनाचे ढेकर येणारच ! आपण पांडवांना उगीच भोजन तयार करण्यास सांगितले ते हरिभक्त आता रागावतील तेव्हा तिकडे जाणेच नको असा विचार करून दुर्वासाने शिष्यासह पलायन केले, हरिभक्तापुढे दुर्दैवाची मात्रा चालत नाही हेच खरे म्हणून दुर्वास म्हणतो–

स्मृत्वाऽनुभावं राजर्षेरम्बरीषस्य धीमतः ।
बिभेमि सुतरां विप्रा हरिपादाश्रयाज्जनात् ॥

◆ ◆ ◆

प्रा. प्रभा कन्नूर ( सोनटक्के )

# 'लल्लेश्वरी' - कश्मीर कवयित्री

कश्मीर मधील १४ व्या शतकातील ही संतकवयित्री लल्ला, लल्लेश्वरी, लल्लायोगेश्वरी, लालदीदी, अशा अनेक नावांनी तिचा उल्लेख केला जातो. ती मोठी योगिनी होती व शैवपंथाची पुरस्कर्ती होती. जुन्याकाळी कश्मीरमध्ये शैवयोगाचा अभ्यास अनेक विद्वान करीत, या शैवयोगाचा प्रभाव इतका पडला होता की रामानुजासारखे कट्टर वैष्णवपंथीही त्याचे स्वरूप कळून घेण्यासाठी मद्रास ते कश्मीरपर्यंत प्रवास करताना आढळतात. "शैवयोगात परमसिद्धांत अद्वैत हाच आहे. यालाच 'ईश्वराद्वयवाद' असेही म्हणतात. मात्र शंकराचार्यांच्या ब्रह्मवादाहून हे अद्वैतवादी शैवदर्शन थोडेसे निराळे आहे. शैवदर्शनात परमात्मा हा विश्वोत्तीर्ण अवस्थेमध्ये स्वतंत्रशक्तीने संपन्न असून त्याच्या ठिकाणी जगत्कर्तृत्वादी सर्व धर्म असतात. पण असे कर्तृत्वादी धर्म ब्रह्मवादी शंकराचार्य विश्वोत्तीर्ण अवस्थेमध्ये मानीत नाहीत. त्यांच्यामते परब्रह्म हे विश्वोत्तीर्ण स्थितीत निधर्मक, निर्गुण, निष्क्रिय म्हणून शुद्ध निर्मल व कर्तृत्वशून्य असते. शैवदर्शनात परमात्मा हा विश्वाची सृष्टी, स्थिती, संहरण, अनुग्रह, व विलयन या पांच गोष्टींचे संपादन करू शकतो. या शिवाय शैवदर्शनात साधनमार्ग जो आहे तो ज्ञानमार्गाचाच पक्षपाती नाही. शैवयोगात ज्ञान आणि भक्ती या दोन्ही गोष्टींचे सामंजस्य आहे. शंकराचार्यांच्या मतामध्ये अंतिम अवस्थेत भक्तीला बिलकूल स्थान नाही. कारण त्यांच्यामते भक्ती ही द्वैतवादावरच उभारली जाते. शैवयोगात भक्तासाठी जरी द्वैताची योजना करावी लागली तरी ती अद्वैताला बाधक होत नाही; कारण द्वैत हे कल्पित असते."

"द्वैतं बोधाय मोहात् प्राक् ज्ञाते तत्त्वे मनीषया ।

भक्त्यर्थं कल्पितं द्वैतमद्वैतादपि सुन्दरम् ॥" ( बोधसार )

लल्लेश्वरीच्या कवनात याच शैवयोगाचा पुरस्कार केलेला आढळतो.

लल्लेश्वरीच्या चरित्राबद्दल फार थोडी माहिती उपलब्ध आहे. सर्वसाधारणपणे १४ व्या शतकाचा उत्तरार्ध हा तिचा कालखंड मानला जातो.

अनुक्रमणिका

पाशियन सुफीसाधू सय्यद हमदानी हा इ. स. १३८० मध्ये काश्मीरला आला तो व लल्लेश्वरी हे समकालीन मानले जातात. काश्मीरी हिंदू म्हणतात की सय्यद हमदानीने तिच्याकडून स्फूर्ती घेतली. याउलट मुसलमान म्हणतात की तिनेच सय्यद हमदानीची तत्त्वप्रणाली उचलली. हा मतभेद असला तरी सर्वांनाच लल्लेश्वरी बद्दल नितांत आदर आहे. आजसुद्धा काश्मीरमध्ये तिचे नाव सर्वतोमुखी आहे. तिची वाणी काश्मीरी लोकांच्या अंतःकरणाला जाऊन भिडते, व तिचे शब्द म्हणीसारखे वापरले जातात.

श्रीनगरपासून आग्नेयेस चार मैलावर असलेल्या पंद्रेनथान या गावी काश्मीरीपंडित कुटुंबात लल्लेश्वरीचा जन्म झाला. तिच्या वडिलाचे वेद व धर्मग्रंथाचे अध्ययन मोठे होते. त्यांच्या घरी इतर-धर्मीय संतमहंत येत काश्मीरात त्या वेळी मुसलमान राजवट होती. मुसलमानी धर्माचा प्रचार व प्रसार करणारे सुफी, शिया, सुनी इ. पंथाचे पुरस्कर्ते त्या वेळी तेथे होते. त्यामुळे धर्म अनेक असले तरी परमेश्वर एकच हा ठसा बालपणासून तिच्या मनावर उमटला होता. तिच्याबद्दल दंतकथा प्रसिद्ध आहेत त्यावरून तिला पूर्वजन्मीचे ज्ञान दिसते. या अद्‌भुतकथांचा भाग सोडला तर तिच्याबद्दल परंपरेनी आलेली काही माहिती मिळते.

वयाच्या बाराव्या वर्षी तिचे लग्न झाले. लल्ला आता श्रीनगरहून ८ मैलावर असलेल्या पाम्पोरला आली. परंतु सासरी तिचे दिवस सुखात गेले नाहीत. तिच्या सावत्रसासूने तिचा फार छळ केला. चांगले खावयासही तिला मिळत नसे. जेवण वाढताना लल्लाच्या भातात सासू खडे मिसळत असे. यावरून काश्मीरी भाषेत "जेवणासाठी बकरे कापलेले असो, लल्लाच्या पानात मात्र दगड' अशी म्हणच पडली आहे. लल्लाचा नवरा स्वभावाने साधाभोळा होता. हळहळू सासूने मुलालाही तिच्याविरुद्ध चिथावले लल्लाच्या चारित्र्याबद्दल वाटेल ते खोटे नाटे ती मुलाला सांगू लागली. 'लल्ला तुझ्याशी एकनिष्ठ नाही' इतपर्यंत मजल गेली. 'तुझी बायको भल्या पहाटे पाणी आणण्यास नदीवर जाते व चार चार तास माठ भरून आणण्यास लागतात. हे सगळे लक्षण चांगलेच आहे नाही ?" आईच्या कागाळ्याने संतापून एके दिवशी त्याने लल्लाच्या डोक्यावरील भरलेला माठ ठोसा मारून फोडला. लल्ला फुटलेल्या माठाची खापरे घेऊन नदीवर गेली व त्या खापरातून पाणी आणून तिने घरातील भांडी भरली. भांडी भरून झाली तरी खापराच्या तुकड्यात पाणी शिल्लकच; ते तिने बाहेर फेकले. त्याचाच छोटासा तलाव झाला. आजसुद्धा

"लल्लत्राग" म्हणून तो तलाव ओळखला जातो अशा तऱ्हेने लल्लाचे जीवन अतिशय कष्टमय व दुःखी होते. परंतु ती फार सद्गुणी स्त्री होती. कर्तव्यदक्ष, शांत, सहनशील, विनम्र अशी तिची वृत्ती होती. अगदी निमूटपणे ती सारे सहन करी. परंतु सासूपुढे तिचा टिकाव लागला नाही. एके दिवशी त्या जहाँबाज सासूने लल्लाला घरातून हाकलून दिले.

लल्लाचा लहानपणापासूनच परमेश्वराकडे ओढा होता. त्यात सासूच्या छळाने व नवऱ्याच्या बेफिकीर वागण्याने संसाराबद्दलची तिची उदासीनता वाढतच गेली. घरातून हाकून दिल्यावर फाटक्या-तुटक्या चिंध्या गुंडाळून अर्ध-नग्न अवस्थेत ती भटकत राहिली. अशा भ्रमंतीत काही काळ गेल्यावर 'सेद-बायू' यांची व तिची गांठ पडली. काहींच्यामते 'सेदबायू' म्हणजेच सिद्ध श्रीकंठ. 'सेदबायू' हे मोठे सत्पुरुष असून काश्मीरच्या आधुनिक शैवपंथाचे आद्य संस्थापक 'वसुगुप्त' यांच्या परंपरेतील होते. गुरूंच्या शिकवणीने लल्ला शैवयोगिनी बनली. याचक भक्ताची भूमिका घेऊन अर्धनग्न अवस्थेत कवने म्हणत नाचत गात ती भटकत असे. तिच्या या वागण्याने लोक जेव्हा तिची कानउघाडणी करीत तेव्हा ती म्हणे "स्तुती किंवा निंदा यांच्यात काहीच फरक नाही, आणि या करता दोहोंचा जाणत्याने शांतपणाने स्वीकार केला पाहिजे." लोक एकदा तिची टवाळकी करीत होते. तिथे एक कापडाचे दुकान होते. तिथून तिने थोडे कापड मागून घेतले व त्याचे दोन तुकडे केले. त्या-पासून दोन झोळ्या बनवल्या. एक डाव्या खांद्याला व दुसरी उजव्या खांद्याला अडकवली. वाटेत कोणी शिवी दिली की ती डाव्या झोळीत एक दगड टाकी. कोणी नमस्कार केला तर उजव्या झोळीत दगड टाकी. संध्याकाळी ती त्या दुकानदाराकडे आली व त्या झोळ्यांचे तिने वजन करावयास लावले. वजन सारखेच भरले तेव्हा ती म्हणाली :—

"आसा बोल पळीनिम् ।। सासा
मि मन्वासा खेद् ना हिय् ।।
सहजे शंकर भच्चू आसा ।।
मकुरस ।। खासा मल् क्या पिय् ।। "

"हजारो जिभांनी मला शिव्या देऊ देत, माझ्या अंतःकरणाला त्याचे दुःख होणार नाही. मी त्या शिवाची भक्ती करीत असताना माझ्या मनाच्या आरशावर धूळ कशी बसेल ?" खरे पहाता बाह्य जग तर मायेपासून बनले आहे. माणसाला आत्म्याची खरी ओळख पटली पाहिजे. "आत्मतत्त्व अन्

परमतत्त्व ते । समान जेव्हा ओळख पटते " तेव्हाच जीवाचे सार्थक होते. ही ओळख लल्लाला चांगलीच पटली होती.

काश्मीरमधील संतसाधू तिच्याशी चर्चा करीत व तिला फार मान देत असत. वादविवाद करीत असताना ती आपल्या गुरूंनाही मागे सारी. एके दिवशी तिच्याबरोबर चर्चा करीत असता 'सेदबायू' यांनी काही प्रश्न विचारले. सर्व प्रकाशात श्रेष्ठ प्रकाश कोणता? सर्व तीर्थयात्रेत श्रेष्ठ तीर्थयात्रा कोणती? सर्व नात्यात श्रेष्ठ नाते कोणते? सर्व सौख्यात खरे सौख्य कोणते? लल्ला म्हणाली "सूर्य प्रकाशासारखा कोणताच प्रकाश नाही. गंगेसारखी कोणतीच तीर्थयात्रा नाही. भावासारखे कोणतेच नाते नाही, व स्त्रीसुखासारखे कोणतेच सुख नाही. 'सेदबायू' चेष्टेने म्हणाले "उत्तर चूक. खरे पहाता, चक्षुतेजासारखे कोणतेच तेज नाही. गुडघ्यासारखी (परमेश्वरासमोर विनम्र होणे) कोणतीच तीर्थयात्रा नाही. प्रत्येकाचे खिशाशी असणारे नाते यापेक्षा श्रेष्ठ नाते नाही आणि घोंगड्याच्या उबेसारखे दुसरे सुख नाही." लल्ला म्हणाली, हेही उत्तर चूक. खरे सांगायचे तर आत्मज्ञानासारखा प्रकाश नाही दैवी प्रेमप्राप्तीसारखी तीर्थयात्रा नाही. देवाच्या नात्याहून श्रेष्ठ नाते नाही. परमेश्वरासंबंधी भीती यासारखे सुख नाही."

अशा तऱ्हेने परमेश्वरभक्तीत तल्लीन होत व यौगिकतत्त्वांचा पुरस्कार करीत व उपदेश करीत लल्लेश्वरी काश्मीरभर फिरली. काश्मीरमधील मजूर असो अगर कलाकुसरीतील किमयागार कारागीर असो, सगळ्यांच्या तोंडी तिची "वाखो" म्हणजे वाकचे भक्तीभावाने घेतली जाऊ लागली. हिंदु अगर मुसलमान असो लल्लेश्वरी सर्वांचीच होती. हिंदू तिला 'लल्लमाता' म्हणतात तर मुसलमान "लल्लआरिफा" म्हणून तिचा गौरव करतात. तिच्यापाशी भेदभाव नव्हताच ती म्हणायची–

"शिव छुय थलि थलि रोजान ।
मव जान हयोदं त मुसलमान ॥
त्रुक अय छुय त पान पनुम परजनाव
सोय छय साहिबस सूत्य जानी जान ॥

"शिव सारे चराचर व्यापून राहिला. तू असे मानू नको की हिंदू वेगळे आहेत. मुसलमान वेगळे आहेत." शहाणा असशील तर एकच गोष्ट कर. तू कोण आहेस येवढेच ओळख तीच खरी शिव व साहिब यांची ओळख"

मूर्तिपूजा तिला मान्य नव्हती. मूर्तीपूजेचे थोतांड माजवणारांना ती म्हणे,

"देव वट्टा देवरो वट्टा
पिट्ठु बन् छोय एक वाट् ॥
पूज् कस् करिक् होट्टाबट्टा
कर् मनस् त पवनस्॥ संघाट् ॥

"अरे! देव दगडाचा आणि देऊळसुद्धा दगडाचेच. पूजा तू कोणाची करणार? वर खाली सर्वत्र हा एकच दगड आहे. प्राण व मन वेगळे नाहीत. तिचा दृष्टिकोन हा अंधश्रद्धा व धर्मवेडेपणाचा नाही सर्व धर्माबद्दल समभाव, भूतदया व प्रेम अंत:करणात बाळगणारा परमेश्वराचा सेवक तोच खरा संत असे ती मानते. शिव, केशव, बुद्ध, ब्रह्मा सारे एकच.

"शिव वा केशव जिन् वा कमलुज् ॥
नाथा नाव धारिनिय यी यो ॥
सो मि अबलि कासीतन् भवरुज्
सो वा सोवा सो वा सो ॥

आणि शिव केशव म्हणजे देवता नव्हेत. तर शिव म्हणजे शिवतत्त्व

"अनाहत् ॥ स्वस्वरूप् ॥ शून्यालय"
यस् "नाव" ना रूप् "वर्ण ना गोचर"
अनाम "नादबिन्द्" तयवानो'
एह्य् । देव् तस् "पिठ्ठखतोस"

–अशी तिची व्यापक विचारसरणी होती.

लल्लाचा स्वतंत्रपंथ वा तत्त्वज्ञान नाही. स्वत:ला आध्यात्मिक, गूढ अनुभव आले ते तिने आपल्या कवनांतून प्रकट केले. योगविद्या तिला आत्मसात झालेली दिसते. योगविद्येतील परिभाषा व संकेत तिच्या काव्यात आढळतात यामुळे काही ठिकाणी मात्र तिच्या काव्यात गूढता आली आहे. एके ठिकाणी ती म्हणते" मी रात्रंदिवस त्याला शोधते परंतु शेवटी माझ्याच घरात मला तो विद्वानमाणूस भेटतो तो माझ्या सुदैवाचा क्षण असतो. हळूहळू मी माझा श्वासोच्छ्वास थांबवते आणि माझ्यात तो ज्ञानदीप पेटतो. आत्म्याचा तो प्रकाश मला सर्वस्वी व्यापून टाकतो." दुसऱ्या एका ठिकाणी ती म्हणते "माझ्या देहाची सर्व द्वारे मी बंद करते व त्या चोराला पकडून मी मदतीची याचना करते. तो पळून जाऊ नये म्हणून माझ्या अंत:करणाला मी त्याला करकचून बांधते व मग 'प्रणवा'चा चाबूक घेऊन त्याला फोडून काढते." लल्लाच्या मते योगसाधनेमुळे जग किती

मिथ्या आहे हे कळते; पण योगी त्याही पलीकडे जातो. योगसाधनेने दृश्यजगत् वस्तुज्ञान नाहीसे होते व जीवात्मा आणि परमात्मा यांचे ऐक्य घडते. म्हणजे व्यक्तीची मर्यादित जाणीव अमर्यादित जाणिवेत विलीन होते. सिद्धीमुळे परमेश्वर प्राप्तीत व्यत्यय येतो. आत्मदर्शन झाल्यावर सिद्धीचा निषेधच केला पाहिजे. ईश्वराचा अनुग्रह झाल्याखेरीज खरे ज्ञान होत नाही आणि ते ज्ञान झाल्यावर 'त्वमेवाहं– तूच मी' अशी स्थिती होते. कर्म करताना फलाशा ठेवू नका असे सांगण्यासही ती विसरत नाही. अद्वैत तत्त्वज्ञानाची बैठक असूनही ईश्वरानुग्रहावरील तिची श्रद्धा अढळ होती. ज्ञानमार्गाचा अवलंब करीत असता परमेश्वराच्या उत्कट भक्तीचा तिने त्याग केला नाही. मानवाने परमेश्वर प्राप्तीची पराकाष्ठा करावी पण त्याच्या कृपेवाचून ते ज्ञान नाही असे ती म्हणते :

"बंद कवाडा बघत राहिले
ध्यान मनी ते करुनी उत्कट
दार उघडले, दार उघडले
आणिक दिसला तो संपूर्ण"

– अशी मग दृष्टभेट होते.

अशा तऱ्हेने लल्लाची शिकवण ही उदात्त विचाराने भरलेली आहे ही शिकवण विद्वानांकरता नव्हती तर सर्वसामान्य लोकांकरता होती. तिला आलेले गूढ अनुभव ती गोडवाणीने लोकांना सांगे. या जगात चिरस्थायी काहीही नाही हे सांगण्यासाठी ती म्हणते "एक क्षणभर मी वाहता झरा पाहिला पण दुसऱ्याक्षणी झरा वा त्यावरून जाण्याचे साधन दिसले नाही. एकदा मी एक झुडूप बहरताना पाहिले पण दुसऱ्या क्षणी मला त्यावर फूल वा काटाही दिसला नाही." विचाराबरोबर भावनोत्कटता व काव्यमयभाषा तिच्या कवनात दिसते. रचनाही सोपी. दोह्याच्या पद्धतीप्रमाणे उच्चाराघातावर जोर आहे तिच्या कवनाची दुसरी ओळ दोह्याप्रमाणे असते. मात्र लिखित वाङ्मय नसल्याने काव्य स्मृतीने साठवलेले. त्यामुळे मूळच्या भाषेत व आजच्या भाषेत फरक पडलेला आढळतो. काही जुन्या शब्दांचा अर्थ आजही लागत नाही. जुन्या कश्मीरी भाषेत हे काव्य आहे. कश्मीरीभाषा म्हणजे तत्कालीन प्रांतिकबोली. देवनागरीसारखी लिपी पण संस्कृत धाटणीचे अपभ्रष्ट अशुद्ध उच्चार, कश्मीरीभाषेत वाङ्मय थोडे आहे पण त्यात लल्लाच्या 'वाक्यानी' ची महती फार आहे तिच्या कवनाचा जबरदस्तपगडा लोकांवर बसला आहे. व तिची कवने लोकांनी

आजही जपून ठेवली आहेत. आपले विचार व्यक्त करताना सहजसुंदर दृष्टांत देण्याची तिची हातोटी वाखाणण्यासारखी आहे. ईश्वर प्राप्तीच्या मार्गात किती अडचणी येतात ते ती कापसाच्या बोंडाचा दृष्टांत घेऊन सांगते.

" माझे जीवन हे कापसासारखे आहे. बोंड स्वच्छ होताना त्याने तडाखे खाल्ले, मग पिंजले गेले. हळूहळू पिळूनवळून ते चाकावर घातले गेले मग ठोकून ताणून उभा आडवा धागा तयार झाला. वस्त्र विणून झाल्यावर परिटाकडून बडवून निघाले. मग साबण घालून शुभ्र बनले पण तेवढ्याने कुठे थांबले? शेवटी शिप्याने कापून त्याचे तुकडे केले. मग वस्त्र शिवले गेले. अशी ही जीवाची कठीण कर्मगती आहे." दुसऱ्या एका ठिकाणी असाच एक सुंदर दृष्टांत ती देते. जन्ममरणाच्या फेऱ्यातून आत्म्याचा आक्रोश चाललेला असतो हे सांगण्याकरता ती म्हणते " साखरेच्या गोण्या दुसऱ्या खांद्यावर घेऊन किती ओझी उचलायची ? " या सर्वातून मात्र शेवटी हे नारायण, " हे नारायण, कळले मजला परमतत्त्व ते " अशी तिची समाधानी वृत्ती होते.

अशी ही काश्मीरी कवयित्री मोठी संत आणि योगिनी. श्रीनगरच्या आग्नेयेस २५ मैलावर असलेल्या बिजबिहाड ( व्रजविहार ) येथे जुम्मा मशिदीपाशी, तिने देह ठेवला व परमेश्वरतत्त्वात ती विलीन झाली.

तिच्या काव्यापासून सरजॉर्ज ग्रियरसन, सर रिचर्डटेंपल सारख्या युरोपियनांनाही स्फूर्ती मिळाली. त्यांच्या दीर्घ परिश्रमामुळेच तिचे काव्य–भारतीयांच्या समोर आले. सर टेंपल म्हणतो : " वास्तविक पहाता माझा देश वेगळा, माझा वेष वेगळा. तरीदेखील हे लल्ला तुझ्या काव्याने मी भारला गेलो " लल्लाच्या काव्यप्रभावामुळे सरटेंपल शैवपंथाच्याच नव्हे तर भारतीय तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाकडे वळला. श्रीनगर विद्यापीठात तर तिच्या काव्यावर आज मोठमोठे प्रबंध प्रसिद्ध झालेले मला पहावयास मिळाले.

लल्लेश्वरीच्या काव्याचा परिचय झाला होता. काश्मीरच्या सफरीचाही योग आला. काश्मीरमधे प्रवास करीत असता बिजबिहाड व पांपोरला जाताना केशराच्या सुगंधाबरोबर लल्लेश्वरीच्या काव्याच्या ओळी माझ्या मनात दरवळत राहिल्या व लल्लेश्वरीच्या स्मृतीने त्या प्रवासाला एक आगळाच आनंद प्राप्त झाला.

◆ ◆ ◆

अनुक्रमणिका

श्री. न. ना. गोखले

# मृत्युविचार

अव्यक्ताबद्दलच्या कुतूहल आणि भय या दोन गुणांमुळेच मृत्युसारख्या अनाकलनीय गोष्टीबद्दल त्याच्या स्वरूप आणि गुणधर्माबद्दल सर्वांना जिज्ञासा असते.

वास्तविक पाहता मृत्यु ही सदासर्वदा सर्वकाळी आणि सर्वस्थळी घडणारी गोष्ट आहे. हे संपूर्ण जगच नाशिवन्त असल्यामुळे त्यामधील नामरूपात्मक सर्व वस्तूंचा नाश होणार हे ठरलेलेच आहे. कारण भगवंतांनी स्वतःच गीतेमध्ये सांगितलेले आहे की जातस्य हि ध्रुवो मृत्युः । ध्रुवं जन्म मृतस्य च । ज्याला आदि आहे त्याला अंत हा निश्चितच आहे.

तथापि ही गोष्ट नित्य घडणारी असली तरी ती कशी का घडते याची कल्पना सर्वसाधारणपणे नसते. मृत्यूची व्याख्या काय करता येईल ? तिचे कारण काय इत्यादी अनेक प्रश्नांची आवर्तने या गोष्टीबद्दल आहेत. त्याला अनेक प्रकारांनी अनेक तऱ्हांनी उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे, अजून चालू आहे आणि यापुढेहि होत राहील. परंतु अंतिम सत्य हे नेहमीच अनुभूतिजन्य असल्यामुळे ते इतक्या सहजासहजी प्राप्त होणारे नाही.

देहपाताला आपण मृत्यु म्हणतो त्याने देह ठेवला हा शब्दप्रयोग आपण कायमच करत असतो परंतु हा दृश्य देह क्रिया करायचा थांबला म्हणजे खरोखरच मृत्यु झाला हे मानणे कितपत सत्य आहे ?

अशा प्रकारच्या सर्व इंद्रियांच्या क्रिया थांबल्या म्हणजे आपण त्याला लौकिक मृत्यु म्हणू शकू परंतु तो सर्वस्वी खरा आहे का ? हा प्रश्न चांगलाच गुंतागुंतीचा आहे. देहपात म्हणजे देह टाकणे. तो देह कोण टाकतो तर या जडदेहामधे राहात असलेली प्राण नावाची चेतनात्मक शक्ति ती निघून जाते म्हणजे नाश पावते असे नाही. मग जर ती नाश पावत नाही तर मग या क्रियेला आपण मृत्यु कसे म्हणू शकतो.

अनुक्रमणिका

भारतीय तत्त्वज्ञानामधे नेहमी पाच देहकोषांचा विचार केलेला असतो. या दृष्टीने विचार केला तर आपण ज्याला मरण म्हणून संबोधतो त्याने फक्त अन्नमय कोष असा संबोधित जडदेहच नाहीसा होतो. मनोमय आणि आनंदमय कोषांना त्यामुळे धक्का पोचत नाही. परलोकगतींचा विचार करताना सुद्धा जो अतिवाहिक देह गृहीत धरला जातो त्याचे सूक्ष्मशरीर सुद्धा अंतक्रियेच्या वेळी केल्या जाणाऱ्या हवन इत्यादि द्रव्यांच्या सूक्ष्म अणू-परमाणूपासून बनलेले असते म्हणजेच थोड्याशा प्रमाणात का होईना स्थूल जगताशी संबंध प्रस्थापित असतोच. मग त्याला मृत्यु म्हणावयाचे की नाही ?

देहपातासंबंधी भगवंतांनी गीतेमधे म्हटलेच आहे की —

वासांसि जीर्णानि यथा विहाय।
नवानि गृह्णाति नरोपराणि।
तथा शरीराणि विहाय जीर्णानि
अन्यानि संयाति नवानि देही।

या आधारे विचार केला तर निराळाच प्रकाश या गोष्टीवर पडेल. जुने वस्त्र टाकून जर आपण नवीन वस्त्र धारण केले तर आपण फक्त वस्त्राचा नाश झाला असे म्हणतो. वस्त्र धारण करणाऱ्याचा नाश झाला असे समजत नाही. तद्वतच हा देहरूपी डगला धारण करणारी जी आत्मा नावाची अजर अमर आणि अविनाशी वस्तू आहे ती कधी नाश पावत नाही आणि स्थूल जगात राहण्यासाठी त्याला कोणते ना कोणते तरी देहरूपी वस्त्र धारण करावेच लागते. त्यामुळे आपण जड देहाच्या अक्रियत्वाला मृत्यु म्हणू शकत नाही.

मग ज्याला आपण मृत्यु म्हणू शकू अशी ही कल्पना काय आहे ? तिचे स्वरूप काय ? ती कशामुळे घडते ? अर्थातच या ठिकाणी आपण मृत्यु म्हणजे लौकिक मृत्यूचाच विचार करतो आहोत. तर या देहपाताविषयी अनेक कल्पना आहेत. सर्वसाधारण कल्पना अशी की आयुष्य संपल्यावर माणूस मरतो. दुसरी एक कल्पना अशी की प्रत्येक सजीव आणि निर्जीव वस्तूचे दृश्यत्व हे त्या वस्तूच्या कंपनसंख्येवर अवलंबून असते. त्या कंपनसंख्येत काही कारणानी जर बदल झाला तर ती वस्तू आपल्या दृष्टीने नाहीशी होते. ती निराळ्या कंपनसंख्येवर जाते. म्हणजेच काय तर त्या वस्तूच्या जाणिवेला धारण करणारी जी अविनाशी वस्तू असते ती नाश पावत नाही.

लौकिक मृत्यु ही अेकप्रकारची दीर्घ मूर्च्छाच मानावी लागेल. कारण कर्माकर्माच्या फलानुसार कांही ठराविक काळानंतर परत कुठेतरी त्या चेतनवस्तूचा अविर्भाव होतच असतो.

अशा तऱ्हेच्या लौकिक मृत्यूने सर्व विश्व व्यापलेले आहे काय? नाही कारण कालाचे अनेक भेद आहेत. आणि त्या भेदांनुसार त्या त्या परिसरातले मृत्यूचे स्वरूप बदलत असते. इथपर्यंत फक्त व्यक्ति मृत्यूचाच विचार झाला समष्टिरूप मृत्यूलाच प्रलय म्हणतात. या प्रलयाचेही बरेच स्तर आहेत. सगळ्यात अगोदर आपल्या या स्थूल जगताचा प्रलय होतो. नंतर प्रकृति प्रलय आणि सर्वात शेवटी माया० चा प्रलय होतो त्यानंतर राहते ती ब्रह्मावस्था होय या अवस्थेप्रत गेल्यानंतरच खरोखर मृत्यु झाला असे म्हणावयास हरकत नाही.

परंतु मृत्यूच्या अनेक व्याख्या वेदांमधे आणि उपनिषदांमधेही केल्या गेल्या आहेत. मृत्यु म्हणजे परलोक आणि स्थूल जगत यांमधील दुवा मानलेला आहे. व्यक्त आणि अव्यक्त यांमधील ती संधिरेषा आहे. अेका प्रकारच्या जगामधे विशिष्ट प्रकारच्या इंद्रियसमूहाने बनलेल्या शरीराचा त्याग करून दुसऱ्या प्रकारचे शरीर धारण करणे म्हणजे अेकप्रकारचा मृत्युच होय. वेदांमधे तर १०० प्रकारचे मृत्यु मानले गेले आहेत.

मृत्यूची मुच्यते इति मृत्यु: । ही व्याख्या ध्यानात घेतली तर त्याचे खरे स्वरूप लक्षात येईल. सोडविणारा मुक्त करणारा तो मृत्यु.

ज्या अविनाशी तत्वाला आपल्या मी पणाची जाणीव असते आणि ज्याच्यामुळे आपण व्यवहार करतो असे वाटते, त्याचा शेवट फक्त ब्रह्मस्थितीमधेच होऊ शकेल. वास्तविक पाहता आत्मा हा ब्रह्मस्वरूपच आहे. फक्त माया परिणामामुळे आपण त्याला विकारी समजत असतो. हा अज्ञानजनित परिणाम नाहीसा झाला म्हणजे आत्मा स्वस्वरूपात स्थित झाला असे म्हणता येईल. त्या ठिकाणी मीपणाची जाणीव नष्ट होऊन मनुष्य कालातीत होतो. आणि त्यासाठी साधन म्हणून आत्मा देहपाताचा उपयोग करत असतो. अशा मुक्त आणि ब्रह्मस्थित आत्म्याच्या स्वरूपाला उद्देशूनच 'मुच्यते इति मृत्यु: !' अशी व्याख्या केली असावी असे वाटते.

 Regd. No. SAT 3

# नवभारत : ज्ञानेश्वर विशेषांक

## नोव्हेंबर १९७५

## या अंकात—